# नवभारत

वर्ष ९ वें ] डिसेंबर १९५५ [ अंक ३ रा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## ' नवभारत ' निधि

# -- विनंति --

' नवभारत ' मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ' नवभारता'च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळया भागांतील निरनिराळया क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु. देणगी देणारांस ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत जाईल. या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ' नवभारत ' निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे नोव्हेंबर १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| श्री. रामचंद्र दिनकर दीक्षित, मुंबई | १०० |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रक्कम | ४४१३ |
| एकूण | ४५१३ |

' नवभारत ' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार), श्री. कृ ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

' नवभारत ' निधि-समितीचें कार्यालय c/o ' नवभारत ' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या "खजिनदार, ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ " या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।११।१९५५ **कृ. ना. फडके**
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** } कार्यवाह

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें | नवभारत | डिसेंबर

अंक तिसरा | १९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१९ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# 'नवभारत' मासिक, डिसेंबर १९५५

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे-- का. सं. ]

**प्रा. म. म. वा. वि. मिराशी** ( नागपूर )— सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित व पुराणेतिहाससंशोधक. ' कालिदास ', ' संशोधन-मुक्तावली ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**डॉ. ना. र. इनामदार एम्. ए. पीएच्. डी** — डे. ए. सोसायटीच्या बॉंबे कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. माधवराव बागल** ( कोल्हापूर )— महाराष्ट्रांतील प्रसिद्ध कार्यकर्ते. चित्रकला व साहित्य यांचे व्यासंगी लेखक. ' जीवनप्रवाह ' या आत्मचरित्राचे लेखक.

**श्री. तु. शं. कुलकर्णी**— हैदराबाद येथें मेडिकल डिपार्टमेंटमध्यें नौकरी. यांच्या कविता व लघुकथा मराठी नियतकालिकांतून येत असतात.

**सेनापति पां. म. बापट** ( मुंबई )— महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध तेजस्वी कार्यकर्ते. त्यांच्या वयाला नुकतींच ७५ वर्षे पूर्ण होऊन तत्प्रीत्यर्थ ' अमृतमहोत्सव ' नुकताच साजरा झाला. ' गीताहृदय ', ' Holy Song ', ' समग्र ग्रंथ ' इत्यादींचे लेखक.

**प्रा. दि. के. बेडेकर**— नाशिक येथील हं. प्रा. ठा. कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. 'संयुक्त महाराष्ट्र', ' साहित्यः निर्मिति व समीक्षा ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**प्रा. वि. ग. जोशी**— अमळनेर येथील प्रताप कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक.

**श्री. विश्वनाथ के. महाबळेश्वरकर**— हिंगणें येथील महिलाश्रम हायस्कूलमध्यें शिक्षक.

**प्रा. प्र. रा. दामले**— पुणें विद्यापीठ व वाडिया कॉलेज यांमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. 'Philosophical Essays' या पुस्तकाचे लेखक. इंग्लंडमधील तत्त्वज्ञानक्षेत्रांतील आधुनिक प्रवृत्तींचा अभ्यास करण्याकरितां ते इंग्लंडला गेले होते, ते नुकतेच परत आले.

**प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर**— पुण्याच्या ' डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट ' मध्यें ' मराठा इतिहासा'चे प्राध्यापक होते. ते गेल्या मे महिन्यांत तेथून सेवानिवृत्त झाले. तरी त्या संस्थेशीं त्यांचा संबंध चालू असून त्यांचें संशोधन व अध्यापन चालूं आहे. ' Panipat ' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. मधुकर जावडेकर एम्. ए.** ( मुंबई )— अखिल-भारत खादी ग्रामोद्योगमंडळांत आर्थिक सं[illegible]धन विभागांतील कार्यकर्ते. ' घरगुती धंद्यांचें अर्थशास्त्र ' या पुस्तकाचे ले[illegible].

**प्रा. मा. प. मंगुडकर**— पुणें येथील वाडिया कॉलेजमध्यें राज्यशास्त्राचे प्राध्यापक. ' व्यक्तिस्वातंत्र्याचा इतिहास ', ' महात्मा फुले व सत्यशोधक चळवळीचा इतिहास ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

---

अनुक्रमणिका

प्रा. वा. वि. मिराशी

# संस्कृत ‘ मृच्छकटिक ’ नाटकासंबंधीं कांहीं विचार

संस्कृत वाङ्मयांतील मृच्छकटिक हें नाटक अनेक दृष्टींनीं वैशिष्ट्यपूर्ण आहे. सामान्यतः संस्कृत नाटकांतील विषय महाभारत-रामायणांतून घेतलेले असतात. त्यांत ऐतिहासिक कथानकाचा उपयोग केलेला असल्यास तें बहुधा एखाद्या राजाच्या अंतःपुरांतील प्रेमकलहावर उभारलेलें असतें. भवभूतीच्या ‘मालती-माधवा’सारखीं कांही थोडीं सामाजिक नाटकें संस्कृत वाङ्मयांत आहेत, पण त्यांतहि समाजाच्या वरच्या थरांतील पात्रेंच आढळतात. ‘मृच्छकटिक’ हें नाटक या सर्वांहून अगदीं वेगळ्या तऱ्हेचें आहे. त्यांत गणिका, संवाहक, द्यूतकर, विट, चेट इत्यादि समाजाच्या खालच्या थरांतील पात्रें घातलीं आहेत. या वैशिष्ट्यामुळें हें नाटक New Attic Comedy च्या धर्तीवर रचलें होतें असा कांहीं पाश्चात्त्य विद्वानांनी तर्क केला होता; पण त्याला कांहीं आधार नाहीं.

‘ मृच्छकटिक ’ नाटकासंबंधी अनेक प्रश्न उपस्थित होतात. भासकृत ‘ चारुदत्त ’ नाटकाशीं त्याचें संविधानक, पात्रें, भाषा इत्यादिकांत आश्चर्यकारक साम्य लक्षांत घेतां, शूद्रकानें भासाच्या नाटकाला वाढवून परिणत रूप दिलें, किंवा शूद्रकाच्या ‘मृच्छकटिका’चीच ‘चारुदत्त’ ही संक्षिप्त रंगावृत्ति तयार करून कोणी अज्ञात गृहस्थानें ती भासाच्या नांवावर प्रचलित केली— असे या बाबतींत दोन पक्ष संभवतात. अद्यापि या प्रश्नाचा निर्णय समाधानकारक रीतीनें लागलेला नाहीं. याशिवाय ‘ मृच्छकटिका ’चा कर्ता शूद्रक हा केव्हां व कोठें होऊन गेला हाहि प्रश्न अद्यापि अनिर्णीतच आहे. हे झाले बहिरंगपरीक्षणाचे प्रश्न. याशिवाय ‘मृच्छकटिकां’तील संविधानक, त्यांतील पात्रांचे स्वभावविशेष, त्यांतील घटना घडण्यास लागणारा काळ इत्यादि अंतरंग-प्रश्नहि विवाद्य झाले आहेत व त्यावर अनेकांनी लिहिलें आहे. ‘ सह्याद्रि ’ मासिकाच्या गेल्या वर्षीच्या ( १९५४ ) दिवाळी-अंकांत ( पृ. ५६५–५७४ ) श्री. पु. रा. लेले यांनीं लिहिलेल्या लेखामुळें यांतील कांही अंतरंग-प्रश्नांच्या विवेचनास पुनः चालना मिळाली आहे. या निमित्तानें प्रस्तुत नाटकविषयक कांहीं प्रश्नांची थोडी-बहुत चर्चा करण्याचा प्रयत्न येथें करीत आहे.

‘ मृच्छकटिक ’ नाटकाचें कथानक घडून येण्यास किती काळ लागला याविषयीं भिन्न भिन्न मतें व्यक्त झालीं आहेत. श्री. लेले यांच्या मतें ‘ नाटकाची सुरवात झाल्यापासून तीन रात्री आणि एक दिवस एवढ्याच मुदतींत नाटकाचें सगळें कथानक घडून आलेलें दिसतें. याच्या उलट ‘ सत्यकथे’च्या जानेवारी १९५५ च्या अंकांतील लेखक श्री बी. काश्यप म्हणतात कीं “ सबंध ‘ मृच्छकटिक ’ नाटकांतील घटना पंधरवड्याहून अधिक काळांत व स्थूल मानानें तीन आठवड्यांत घडल्या आहेत. ” ( पृ. १० ). ‘मृच्छकटिक’ नाटकांतील बहुधा सर्व अंकांत कालनिर्देशाचे उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतात. त्यांचा साकल्यानें विचार केल्यास हा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविणें कठीण जाऊं नये.

‘ मृच्छकटिक ’ नाटकाचें कथानक नक्की कोणत्या महिन्यांत घडलें याची चर्चा कोणी केलेली मला माहीत नाहीं. म्हणून तो प्रश्न प्रथम घेऊं.

चारुदत्त व वसंतसेना यांची प्रथम दृष्टादृष्ट झाली ती कामदेवायतनोद्यानांत असें अनेक ठिकाणीं म्हटलें आहे.[२] ती अर्थातच कामदेवाच्या किंवा मदनाच्या उत्सवप्रसंगींच झाली असावी. प्राचीन काळच्या उत्सवांची एक यादी वात्स्यायनाच्या ‘ कामसूत्रां’त ( ४, ४२ ) आली आहे. तींत ‘ सुवसन्तक ’

१ या प्रश्नावर प्रस्तुत लेखांत थोडा प्रकाश पाडण्याचा प्रयत्न केला आहे.

२ ‘मृच्छकटिक’ ( डॉ वा. गो. परांजपे यांनीं संपादिलेली आवृत्ति ), पृ. १६, २५, २७, २८, ३४ इ. –पुढील संदर्भहि याच आवृत्तीचे समजावे.








नामक उत्सवाचा निर्देश आहे. 'कामसूत्रा'चा टीकाकार यशोधर यानें 'सुवसन्तो मदनोत्सवः । तत्र नृत्यगीतवाद्यप्रायाः क्रीडाः' ('सुवसन्त म्हणजे मदनोत्सव होय. या उत्सवांत नृत्य, गीत, वाद्य यांचें प्राचुर्य असलेल्या क्रीडा होतात') असें म्हटलें आहे. हा 'सुवसन्तक' म्हणजे सध्यांचा वसन्तपञ्चमी-चा उत्सव होय. हा सध्यांहि माघ शुक्ल पञ्चमीस साजरा केला जातो. पण 'मृच्छकटिकां'त उल्लेखिलेला उत्सव हा नसावा. मदनोत्सवांत चारुदत्ताला पाहिल्यावर वसंतसेनेचें मन त्याच्यावर बसलें व तेव्हांपासून तिनें इतरांच्या मागणीस नकार देण्यास आरंभ केला असें पहिल्या अंकांतील (पृ. १६) शकाराच्या उक्तीवरून आपणांस कळतें. 'मृच्छकटिक' नाटकाचें कथानक त्यानंतर थोड्याच दिवसांनीं घडून आलें असावें. तें घडलें तेव्हां उन्हाळा चांगलाच कडक भासूं लागला होता असें आठव्या अंकांतील (पृ. १३६–१३७) शकार व विट यांच्या भाषणावरून स्पष्ट दिसतें. 'पुष्पकरंडक उद्यानांत माझी गाडी लौकर घेऊन ये' असें शकारानें आपल्या चेटास बजावलें होतें. पण मध्यं-तरीं घडलेल्या कांहीं घटनामुळें, विशेषतः राजमार्गावर गाड्यांचा खूप जमाव झाल्यामुळें, दोनप्रहर झाले तरी तो आला नव्हता. तेव्हां शकार म्हणतो : 'चिरमस्मि बुभुक्षितः । मध्याह्ने न शक्यते पादाभ्यां गन्तुम् ।' (पृ. १३६) ('मला पुष्कळ वेळापासून भूक लागली आहे. या दुपारच्या वेळीं पायीं चालत जाणें शक्य नाहीं.') त्यावर विटहि दुपारच्या उष्णतेचें खालील वर्णन करतो – 'वृक्षाच्या छायेंत बसलेल्या गाई तोंडांतील गवताचा घास टाकून झोंप घेत आहेत. तहानलेले वनहरिण तळ्यांतील ऊन पाणी पीत आहेत. कडक उन्हाच्या भीतीनें लोक नगरमार्गांनें जात नाहींत. तेव्हां आपली गाडी कडक उन्हानें तापलेली जागा सोडून कोठें तरी छायेंत उभी राहिली असावी.' (अंक ८, श्लो. ११). हें वर्णन अर्थातच वसंतऋतूंतील परिस्थितीला लागू पडणारें नाहीं. तेव्हां चारुदत्त व वसंतसेना यांची प्रथम दृष्टादृष्ट माघ शुक्ल पंचमीस झाली नसावी.

याशिवाय दुसऱ्या एका मदनोत्सवाचा उल्लेख वात्स्यायनानें याच उताऱ्यांत केला आहे. 'कामसू-त्रा'चा टीकाकार यशोधर ह्या मदनोत्सवांत मदनाच्या मूर्तीचें पूजन केलें जातें[3] अशी माहिती देतो. हा उत्सव कोणत्या महिन्यांत होत असे हें त्यानें सांगितलें नाहीं. पण इतर ग्रंथांतील उल्लेखांवरून तो चैत्र शुक्ल त्रयोदशीस होई असें दिसतें. या तिथीला मदनत्रयोदशी म्हणत व त्या दिवशीं अनङ्गपूजाव्रत केलें जाई. या प्रसंगीं नगराच्या बाहेरील उद्यानांत मदनाच्या मूर्तीची पूजा होऊन मोठी यात्रा भरत असे. या उत्सवाचा उल्लेख भवभूती-च्या 'मालतीमाधवां'तहि आला आहे. तेथील उत्सवाची सर्व व्यवस्था त्या त्या नगरांतील स्त्रियांच्या हातीं असे असें दिसतें.[4] या मदनोद्यानयात्रेच्या प्रसंगीं माधव व मालती यांची प्रथम भेट झाली. अशा उत्सवांतच वसंतसेना व चारुदत्त यांनीं परस्परांना प्रथम पाहिलें असावें. त्यानंतर लौकरच 'मृच्छकटिकां-तील' घटना घडून आल्या असाव्या. चैत्र महिन्यांत कडक उन्हाळ्यास सुरवात होत असल्यामुळें मागें उल्लेखिलेलें दोनप्रहरचें वर्णनहि या कालाला जुळणारें आहे[5]

या मदनोत्सवानंतर वसंतसेनेचें चारुदत्तावरील प्रेम वाढत गेलें व ती त्याची भेट घेण्याची संधि पाहूं लागली. मदनोत्सवानंतर सुमारें एक आठवड्यानें चैत्र कृष्ण षष्ठीस 'मृच्छकटिक' नाटकाच्या कथानकास आरंभ झाला असावा. या षष्ठीस सध्यां स्त्रिया उपोषण करीत नाहींत, पण प्राचीन काळीं त्या या तिथीला 'अभिरूपपति' नामक व्रत करीत असें दिसतें. या व्रताचा उल्लेख प्रस्तावनेंत सूत्रधार-नटी संवादांत आला आहे. या व्रतांत दिवसभर उपोषण करून प्रदोषकालीं पारणें होई. या पारण्याकरितां एखादा योग्य ब्राह्मण पाहण्याविषयीं नटी सूत्रधारास सांगते. तितक्यांत

---

३ 'मदनोत्सवो मदनप्रतिकृतिपूजनम्' । – कामसूत्र (काशी संस्कृत सीरिज), पृ. ४९.

४ मकरन्द :–– वयस्य माधव अद्य किल सकलनगराङ्गनाजनप्रवर्तितमहोत्सवाभिराममदनोद्यान-प्रतिनिवृत्तमन्यादृशमिव भवन्तमवधारयामि । – ('मालतीमाधवम्', काळे आवृत्ति, पृ. २१, २४.)

५ तो दिवस वैशाख शुक्ल दशमीचा होता हें पुढें दाखविलें आहे. तो वर्षाकाल नसल्यामुळें आदल्या-दिवशींच्या वादळाला 'अकालदुर्दिन' म्हटलें आहे.










चारुदत्ताचा मित्र मैत्रेय त्या रस्त्यानें जातो. त्यास पाहून सूत्रधार त्याला भोजनाचें आमंत्रण देतो, पण तो तें स्वीकारीत नाहीं. या प्रसंगानें मैत्रेयाच्या मनांत जे विचार आले ते तो पहिल्या अंकाच्या मुख्य प्रवेशांतील आरंभींच्या आपल्या स्वगत भाषणांत व्यक्त करीत आहे. चारुदत्ताची पत्नी धूता हिनेंहि या दिवशीं उपोषण केलें होतें. या तिथीचा ती रत्नषष्ठी असा उल्लेख करते.[६] तिसऱ्या अंकांत आपल्या वाड्यांतून वसंतसेनेचा दागिना चोरीला गेला असें समजल्यावर धूता त्याबद्दल आपली रत्नमाला मैत्रेयास देते. त्या प्रसंगीं ती म्हणते, ' रत्नषष्ठीस मी उपोषण केलं होतें. त्या व्रताच्या पारण्याच्या प्रसंगीं ब्राह्मणास यथाशक्ति दक्षिणा द्यावयास पाहिजे होती, पण ती द्यावयाची राहिली. म्हणून आज ही रत्नमाला मी आपणांस देत आहे. तिचा स्वीकार करावा.' वसंतसेनेच्या दागिन्याची चोरी वैशाख शुक्ल अष्टमीस झाली हें पुढें दाखविलें आहे. त्या वेळीं माहेरून मिळालेली रत्नमाला चोरीला गेलेल्या दागिन्याबद्दल आपण आपल्या पतीला देऊं केली तर तो ती स्वीकारणार नाहीं याची खात्री असल्यामुळें धूता ती दक्षिणेच्या मिषानें मैत्रेयास देत आहे. रत्नषष्ठीचें व्रत थोड्याच दिवसांपूर्वीं झालें असल्यानें त्याची आठवण तिला सहजच झाली व त्या निमित्तानें आपण ही दक्षिणा देत आहों असें तिला सांगतां आलें. पहिल्या अंकांत चारुदत्त व वसंतसेना यांचा प्रणयप्रसंग चालू असतां तिकडे आर्या धूता ' अभिरूपपति ' नामक व्रताचें आचरण करीत होती यांतील विरोधहि शूद्रकानें मोठ्या कुशलतेनें सूचित केला आहे.[७]

' मृच्छकटिका'चा पहिला प्रवेश चैत्र कृष्ण षष्ठीस प्रदोषसमयीं सुरू होतो. संध्याकाळीं देवपूजा आटोपून चौरस्त्यावर मातृदेवतांना बलि ठेवण्याकरितां चारुदत्त मैत्रेयाला सांगतो. ती तिथि कृष्णपक्षांतील षष्ठी असल्यामुळें चंद्रोदय सूर्यास्तानंतर बारा घटकांनीं रात्रीच्या अकरा वाजण्याच्या सुमारास झाला असावा. त्यापूर्वीं गडद अंधकार असल्यामुळें शकार, विट व चेट यांना वसंतसेनेस पकडणें कठीण जातें, तिच्या फुलांच्या सुवासावरून व नूपुरांच्या झंकारावरून त्यांना तिचा माग काढावा लागतो. ती त्यांच्या तावडींतून सुटून चारुदत्ताच्या वाड्यांत बाजूच्या दारानें ( पक्षद्वारानें ) शिरते. तेथें त्यांचें संभाषण झाल्यावर वसंतसेना आपला मौल्यवान् दागिना काढून ठेवते व चारुदत्ताला आपणांस घरीं पोचविण्याविषयीं विनंति करते. चारुदत्त उजेडाकरितां दिवट्या पाजळण्यास सांगतो, पण तितक्यांत चंद्रोदय झाल्यामुळें त्यांची जरूरी भासत नाहीं. तो षष्ठीचा चंद्र असल्यामुळें त्याचें बिंब अर्ध्याहून अधिक होतें. म्हणून चारुदत्ताच्या भाषणांतील ' कामिनीगण्डपाण्डुः ' हें त्याचें विशेषण अन्वर्थ आहे[८]. तेव्हां पहिल्या अंकांतील हा प्रवेश चैत्र कृष्ण षष्ठीस रात्रीं आठ ते अकरा वाजेपर्यंतच्या अवधींत घडला असावा.

दुसऱ्या अंकांतील घटना यानंतर दुसऱ्याच दिवशीं म्हणजे चैत्र कृष्ण सप्तमीस घडल्या. आदल्या दिवशीं चारुदत्ताची भेट झाल्यापासून वसंतसेनेचें चित्त ठिकाणावर नव्हतें. तेव्हां सकाळीं ' स्नान करून देवतांची पूजा कर ' असा तिच्या मातेनें तिला निरोप पाठविला असतां वसंतसेना म्हणते : 'आज मी स्नान करणार नाहीं. तेव्हां ब्राह्मणालाच देवपूजा करूं द्या.' (पृ. ३२). यानंतर संवाहक, द्यूतकर व द्यूतगृहाचा मालक माथुर यांचा संवाद घातला आहे. माथुर द्यूतांत हरलेल्या दहा सुवर्णमुद्रांकरितां संवाहकाला पकडतो, पण तितक्यांत तेथें आलेला दर्दुरक त्याला सोडवतो व तो वसंतसेनेला शरण जातो. त्याच्या भाषणावरून तो पूर्वीं चारुदत्ताची

६ ' मृच्छकटिक ', पृ. ६७.

७ शूद्रकानें या प्रसंगीं धूतेचा अत्यंत विवेकी व धीरगंभीर स्वभाव दाखविला आहे. ' चारुदत्त ' नाटकांत मात्र या प्रसंगीं तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिल्याचें दाखविलें आहे.

८ " 'मृच्छकटिकाच्या' पहिल्या अंकांत शकार वसंतसेनेचा पाठलाग करीत असता आकाशांत ढग आले आणि एकदम घनदाट अंधकार पडला. तेव्हां वसंतसेना चारुदत्ताच्या घरांत शिरली – नंतर ढग विरून गेले किंवा वाऱ्यानें अन्य भागांत गेले आणि चंद्राचा प्रकाश पडला ", असें श्री. लेले म्हणतात. पण तें बरोबर नाहीं. चारुदत्ताच्या भाषणांतील ' उदयति हि शशाङ्कः ' इत्यादि श्लोकांतील ( पृ. ३१ ) पुढें झालेल्या चंद्रोदयाचें वर्णन पहा.












सेवा करीत होता हें समजल्यावर वसंतसेना त्याला आपली सोन्याची बांगडी देऊन कर्जमुक्त करते. तितक्यांत तिचा खुण्टमोडक नामक हत्ती मदोन्मत्त होऊन आपल्या माहुताला ठार करतो व नगरांत धुमाकूळ माजवतो. पण वसंतसेनेचा सेवक कर्णपूरक त्याला लोहदंडानें मार देऊन त्याच्या तावडींत सांपडलेल्या परिव्राजकाला मुक्त करतो. त्याचें तें धाडस पाहून प्रसन्न झालेला चारुदत्त त्याला देण्याकरितां कांहीं अलंकार आपल्याजवळ नसल्यामुळें आपला जाईच्या फुलांनीं सुवासित झालेला शेलाच त्याच्याकडे बक्षीस म्हणून फेकतो. आदल्या दिवशीं चारुदत्ताच्या वाड्यांत तो शेला पाहिला असल्यामुळें त्याच्या जाईच्या फुलांच्या सुवासावरून वसंतसेनेला त्याची ओळख पटते व या प्रसंगानें चारुदत्ताची गुणग्राहकता व दातृत्व यांचा प्रत्यय येऊन तिचें मन त्याच्यावर जास्तच अनुरक्त होतें [९]

तिसऱ्या अंकांतील घटना यानंतर पंधरा-सोळा दिवसांनीं वैशाख शुक्ल अष्टमीस रात्रीं घडलेल्या दिसतात. त्या दिवशीं रात्रीं रेभिलाच्या घरीं गायन होतें. मध्यरात्र झाली तरी चारुदत्त परत आला नाहीं असें पाहून त्याचा सेवक वर्धमानक बाहेरच्या ओवरींत जाऊन झोंपतो. त्यानंतर लवकरच रेभिलाच्या घरचा जलसा संपल्यावर चारुदत्त व मैत्रेय घरीं जाण्यास निघतात. वाटेंतच त्यांना चंद्र अस्तास जात असलेला दिसतो. त्याचें वर्णन चारुदत्तानें 'जलाशयांत बुडून गेलेल्या हत्तीच्या दंताचें वर दिसणारें तीक्ष्ण अग्र' असें केलें आहे. मध्यरात्रीनंतर लवकरच अस्तास जाणाऱ्या चंद्राच्या या वर्णनावरून ती तिथि अष्टमी होती यांत संशय नाहीं. यानंतर पाय धुऊन ते दोघे झोंपीं जातात. झोंपण्यापूर्वी वर्धमानक वसंतसेनेचा अलंकार मैत्रेयाजवळ सांभाळण्यास देतो. यापुढें सर्वत्र पसरलेल्या घनदाट अंधकारांत शर्विलकाला चारुदत्ताचें घर फोडून अलंकार घेऊन जाणें कठीण होत नाहीं.

चारुदत्ताच्या घरची चोरी कोणत्या तिथीस झाली याविषयीं भिन्न भिन्न मतें व्यक्त झालीं आहेत. पहिल्या अंकांतील प्रवेशाच्या दुसऱ्या दिवशीं रात्रीं रेभिलाच्या घरीं गाणें झालें असें श्री लेले म्हणतात. पण तसें असतें तर आदल्या दिवशीं मध्यरात्रीच्या थोडें अगोदर उगवलेला चंद्र दुसऱ्या दिवशीं मध्यरात्रीनंतर लवकरच अस्तास जाणें संभवत नाहीं. हॉर्वर्ड ओरिएंटल सीरिजमध्यें 'मृच्छकटिका'चें इंग्रजी भाषांतर करणारे डॉ. रायडर यांच्याहि ध्यानांत ही अनुपपत्ति आली नाहीं. कारण त्यांनींहि तिसऱ्या अंकांतील घटना दुसऱ्या दिवशींच्या रात्रीं घडल्या असें म्हटलें आहे. मृच्छकटिका'चे विद्वान संपादक डॉ. वा. गो. परांजपे यांचेंहि मत डॉ. रायडरप्रमाणेंच आहे. या मतानुसार पहिल्या व तिसऱ्या अंकांतील चंद्रोदय व चंद्रास्त यांच्या वर्णनाची अनुपपत्ति त्यांच्या ध्यानांत आली होती. पण तिच्याबद्दल त्यांनीं शूद्रकालाच दोषी ठरविलें आहे. ते म्हणतात : "या दोन अंकांतील घटना फक्त एका दिवसाच्या अंतरानें घडल्या आहेत तरी पहिल्या अंकांत चंद्र प्रदोषकाळीं उगवतो व तिसऱ्या अंकांत मध्यरात्रीस मावळतो असें शूद्रकानें अनवधानानें दाखविलें आहे ". पण असें समजण्यास मूळ नाटकांत काडीइतकाहि आधार नाहीं.

तिसऱ्या अंकाच्या या तिथीनें केवळ आधुनिक विद्वानांसच चकविलें असें नाहीं. 'मृच्छकटिका'ची प्रतिकृतिच असें जें तथाकथित भासकृत 'चारुदत्त' नाटक त्याच्या कर्त्यालाहि हाच भ्रम झाला होता. पहिल्या अंकांतील घटना षष्ठीस घडल्या असें त्यांत म्हटलें आहे[१०]. वसंतसेनेचा दागिना स्वतःजवळ ठेवण्याविषयीं चारुदत्तानें सांगितल्यावर मैत्रेय रदनिकेला म्हणतो, "रदनिके, हा अलंकार तूं घे. षष्ठी व सप्तमीच्या तिथीस तूं तो सांभाळ. अष्टमीस अनध्याय असल्यामुळें मी तो सांभाळीन." तिसऱ्या अंकांत चारुदत्त व मैत्रेय रेभिलाच्या जलशानंतर परत आल्यावर रदनिका मैत्रेयाला त्याच्या पूर्वीच्या भाषणा-

९. 'मृच्छकटिकां'त हा शेल्याचा वृत्तांत अत्यंत कुशलतेनें घातला आहे. तो जाईच्या फुलांनीं सुवासित केला होता हें पहिल्या अंकांत सांगून दुसऱ्या अंकांत त्याच्या त्या सुवासावरून वसंतसेनेनें शेला फेकणारा गृहस्थ चारुदत्त होता असें अनुमान केल्याचें दाखविलें आहे. 'चारुदत्त' नाटकांत हा मनोरम प्रसंग नाहीं.

१० 'षष्ठीकृतदेवकार्यस्य तत्रभवतश्चारुदत्तस्य कारणात्...'। – 'चारुदत्त' (भासनाटकचक्रम् , आवृत्ति),

पृ. १९६



अनुक्रमणिका








ची आठवण करून देऊन म्हणते, " हा दागिना मी षष्ठी व सप्तमी या तिथींस सांभाळला. आज अष्टमी तेव्हां आता तूं तो सांभाळ." या संभाषणावरून पहिल्या अंकानंतर तिसऱ्या दिवशींच्या रात्रीं हा प्रकार घडला असें 'चारुदत्ता'च्या कर्त्यास सुचवावयाचें आहे. पण असें असताहि त्यानें पहिल्या अंकांतील चंद्रोदय व तिसऱ्या अंकांतील चंद्रास्त 'मृच्छकटिकां'तल्या प्रमाणेंच वर्णिले आहेत. 'मृच्छकटिकां'त या संबंधांत तिथींचा मुळीच निर्देश नसल्यामुळें कांहींच विसंगति भासत नाहीं. या एकाच उदाहरणावरून 'चारुदत्ता'च्या कर्त्यानें 'मृच्छकटिक' नाटकाची उचलेगिरी केली हें सिद्ध होईल. असो.

चौथ्या अंकांतील घटना यानंतर दुसऱ्या दिवशींच वैशाख शुद्ध नवमीस घडलेल्या दिसतात. सकाळीं चारुदत्ताच्या घरीं चोरी झाल्याची बातमी श्रेष्ठिचत्वरांत ( सराफकट्ट्यावर ) पसरली ती शर्विलकाच्याहि कानीं येते. तेव्हां आपण रात्रीं कोणाच्या घरीं चोरी केली हें त्याला समजते. नंतर तो, तो दागिना घेऊन, वसंतसनेच्या वाड्यांत येतो व मदनिकेनें शिकविल्याप्रमाणें 'माझें घर मोडकळीस आलें असल्यामुळें आपला अलंकार संभाळणें कठीण जात आहे म्हणून तो परत पाठविला आहे' असा चारुदत्ताचा म्हणून खोटाच निरोप वसन्तसेनेस सांगून तिला तो दागिना परत करतो. वसंतसेनेनें त्याचें व मदनिकेचें भाषण आडून ऐकलें असल्यामुळें ती म्हणते : 'आर्य चारुदत्तांनीं मला अगोदरच सांगून ठेवलें आहे कीं दागिना परत करण्यास येणाऱ्या गृहस्थास मदनिका द्यावी. तेव्हा तेच तुम्हास ती अर्पण करीत आहेत असें समजावें' असें म्हणून ती मदनिकेला दास्यांतून मुक्त करून शर्विलकाच्या स्वाधीन करते.[११]

वसंतसेनेचा निरोप घेऊन शर्विलक मदनिकेसह तिच्या वाड्यांतून बाहेर पडतो तोंच "कोणा सिद्ध पुरुषाच्या भविष्यवाणीप्रमाणें गोपालदारक आर्यक राजा होणार हें ऐकल्यावर भयभीत झालेल्या राजानें त्याला गौळीवाड्यांतून आणून घोर बंदीखान्यांत टाकलें आहे. तेव्हा सर्वांनीं आपापल्या ठिकाणीं सावध रहावें' अशी राष्ट्रियाची ( वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्याची ) दवंडी त्याच्या कानीं येते. तेव्हा वसन्तसेनेच्या गाडीवानाला मदनिकेला सार्थवाह रेभिलाच्या घरीं पोचविण्यास सांगून 'माझे नातेवाईक, पराक्रमी विट, राजानें अपमान केल्यामुळें संतप्त झालेले राजसेवक यांना राजाविरुद्ध उठवून मी विनाकारण बंदींत टाकलेल्या माझ्या मित्राची सुटका एकदम छापा घालून करतों' असें म्हणून शर्विलक त्या उद्योगास लागतो.

यानंतर मैत्रेय चारुदत्ताची धर्मपत्नी धूता हिनें दागिन्याचा मोबदला देण्यासाठीं दिलेली रत्नमाला घेऊन वसंतसेनेच्या वाड्यांत येतो. वसंतसेना तिचा स्वीकार करते व म्हणते, "मी प्रदोषसमयीं आपणांस भेटावयास येईन असें आर्य चारुदत्तांना सांगा." मैत्रेय गेल्यावर ती निघण्याची तयारी करते तेव्हां तिची दासी म्हणते, 'आज अकालीं पावसाचा रंग ('अकालदुर्दिन') दिसत आहे.' तो दिवस वैशाख शुद्ध नवमीचा होता. त्यावेळीं वर्षाकाल सुरू झाला नसल्यामुळें त्या काळच्या अभ्राच्छादित दिनास 'अकालदुर्दिन' म्हटलें आहे.

वसंतसेना चारुदत्ताकडे जाण्यास निघाली त्या वेळीं संध्याकाळ झाली होती, आकाशांत काळेभोर ढग जमून अंधार होऊं लागला होता. पण, सूर्य अस्तास गेला नव्हता. हें 'ऐरावतमालपत्रमलिनैरापीतसूर्यं नभः' ( श्लो. २० ) या वर्णनावरून, तसेंच 'माहेन्द्रेण विवल्गतीव धनुषा' ( श्लो. २७ ) यांतील इन्द्रधनुष्याच्या उल्लेखावरून, दिसून येईल. ती चारुदत्ताच्या वृक्षवाटिकेंत पोचली तेव्हां रात्र झाली होती. तो शुक्लपक्ष असल्यामुळें चंद्र आकाशांत होता, पण त्याचा प्रकाश ढगांत लुप्त झाला

११ 'चारुदत्त' नाटकांत अलंकार घेऊन आलेल्या सज्जलकाला चेटी कामदेवकुलांत ( मदनाच्या देवळांत ) थांबण्यास सांगते. तितक्यांत विदूषक येतो. त्याच्याकडून मुक्तावलि घेतल्यावर वसंतसेना त्याला जाऊं देते, पण चारुदत्ताला आपल्या भावी प्रदोषकालाच्या भेटीबद्दल निरोप पाठवीत नाहीं. नंतर ती सज्जलकाची भेट घेते असें दाखविलें आहे. यांत विनाकारण दोन प्रसंगांची उलथापालथ केलेली दिसते. सज्जलकानें अलंकार परत केल्यावर ती 'मला माहीत आहे कीं तुम्ही चारुदत्ताच्या घरीं साहसकर्म करून हा अलंकार आणला आहे' असें स्पष्टच म्हणते. यापेक्षां 'मृच्छकटिकां'तील या प्रसंगाची घटना व त्यांतील भाषणें कितीतरी सूचक व मनोरम आहेत. !








होती[१२]. वैशाखांतील हा पाऊस वादळाच्या रूपाचाच असावयाचा व तसेंच त्याचें वर्णन 'मृच्छकटिका-'च्या पांचव्या अंकांत केलें आहे शूद्रकानें या दिवशीं-च्या वादळाचा उपयोग अनेक प्रकारांनीं केला आहे. या वादळाच्या रात्रीं शर्विलकानें बंदीखान्यावर छापा घालून आर्यकाला सोडविलें. त्या रात्रींच्या पावसामुळें उज्जैनींतील रस्त्यावर चिखल झाला आणि दुसऱ्या दिवशीं पहांटे खेडेगांवांतून त्या नगरींत येणाऱ्या गाड्या चिखलांत रुतून बसल्या. असल्या एका गाडीच्या मालकानें चिखलांत रुतलेल्या आपल्या गाडीचें चाक मारण्याविषयीं विनंति केल्यामुळें शकाराचा गाडीवान् स्थावरक आपली गाडी चारुदत्ता-च्या वृक्षवाटिकेच्या फाटकाजवळ उभी करून त्याच्या मदतीला जातो. तितक्यांत चारुदत्ताची गाडी येऊन उभी आहे, असें समजल्यामुळें वसंतसेना चुकीनें शकाराच्या गाडींत बसते. स्थावरकाला गाडी जड झाल्याचा भास होतो, पण आपण इतरांच्या गाडींचीं चाकें मारण्यांत थकलों असल्यामुळें तसें आपणांस वाटत असेल असें आपल्या मनाचें समाधान करून तो गाडी हांकतो. पुढें त्याचा आवाज परिचित नसल्यामुळें 'आपण भलत्याच गाडींत तर बसलों नाहीं ना?' अशी शंका वसंतसेनेच्या मनांत येते. पण पुष्पकरण्डकजीर्णोद्यान नगरापासून दूर असल्यानें चारुदत्तानें बैलांना जास्त श्रम होऊ नयेत म्हणून पुनः आपली गाडी न पाठवितां दुसरी गाडी व नोकर पाठविले असतील अशी आपल्या मनाची समजूत ती करून घेते.

शूद्रकानें या वादळाचा उपयोग इतरत्रहि केला आहे. या वादळांत पुष्पकरंडक–जीर्णोद्यानांतील एक मोठें झाड मोडून पडलें व त्याच्याखालीं एक स्त्री सांपडून तिचें प्रेत दुसऱ्या दिवशीं सकाळीं विटाच्या दृष्टीस पडलें[१३]. त्यानंतर तिसऱ्या दिवशीं चारुदत्ताचा खटला चालू असतां, त्यानें वसंतसेनेला मारली असावी असा संशय न्यायाधीशास येतो. तेव्हां तो वीरक नामक पोलिस अधिकाऱ्यास "कोर्टाच्या आवारांतील घोडा घेऊन त्वरित जा व कोणा स्त्रीचें प्रेत त्या उद्यानांत आहे काय पाहून ये" अशी आज्ञा करतो. तोंपर्यंत त्या स्त्रीचा मृत देह श्वापदांनीं छिन्नविच्छिन्न केलेला असतो, तथापि अवशिष्ट हात, पाय, केस इत्यादिकांवरून तो देह स्त्रीचाच अशी वीरकाची खात्री होते व तो तसा रिपोर्ट न्यायाधीशास करतो. या प्रमाणें या वादळानें वसन्तसेनेचें चारुदत्तावरचें उत्कट प्रेम व्यक्त होतें एवढेंच नाहीं तर त्यायोगें गाड्यांची अदलाबदल होऊन वसंतसेना शकाराच्या तावडींत सांपडते व चारुदत्तावर तिचा खून केल्याचा आरोप सिद्ध होण्यास मदत होते.

सहाव्या अंकांतील घटना वादळानंतरच्या दिवशीं वैशाख शुक्ल दशमीस घडल्या असाव्या. पहांटे चारुदत्त पुष्पकरण्डक – जीर्णोद्यानांत जाण्यास निघतो. जातांना आपल्या वर्धमानक नामक सेवकाला रात्रींच (म्हणजे सूर्योदयापूर्वीं) गाडी जोडून ठेवून वसंतसेनेला त्या उद्यानांत घेऊन येण्याविषयीं आज्ञा करतो. वर्धमानक त्याप्रमाणें गाडी घेऊन येतो व बुरख्यासहित गाडी बाजूच्या फाटकाजवळ उभी केली आहे अशी रदनिकेला वर्दी देतो. "वसंतसेना आपली वेषभूषा (प्रसाधन) करीत आहे. क्षणभर थांब" असें रदनिका त्याला सांगते. तितक्यांत गाडीमध्यें बसण्याकरितां घालावयाचें बसकूर (आस्तरण) आणावयास आपण विसरलों असें वर्धमानकाच्या ध्यानांत येतें. बैलांना नुकतीच वेसण घातली असल्यामुळें ते आपण गेल्यावर एके ठिकाणीं उभे राहणार नाहींत असें वाटून तो आपली गाडी घेऊन बसकूर आणण्यासाठीं जातो. तितक्यांत संस्थानकाचा (शकाराचा) गाडीवान् तेथें येऊन गाडी उभी करतो व स्वतः दुसऱ्या गाडीवानाच्या गाडीचें चिखलांत रुतलेलें चाक मारण्यास जातो. त्या अवधीं-त वसन्तसेना मागून येऊन चुकीनें त्या गाडीत बसते. संस्थानकाची गाडी निघून गेल्यावर वर्धमानक पुनः

१२ मैत्रेयाच्या भाषणांतील 'अथ किंनिमित्तं पुनरीदृशे प्रणष्टचन्द्रालोके दुर्दिनान्धकारे आगता भवती' (पृ. १०६) पहा. पांचव्या अंकांच्या शेवटीं श्लो. ५१ मध्यें आलेलें इन्द्रधनुष्याचें वर्णन मात्र प्रक्षिप्त दिसतें. डॉ. परांजपे यांनीहि तें तसें मानलें आहे.

१३ 'मृच्छकटिक', पृ. १५३.











आपली गाडी आणून त्याच जागीं उभी करतो. या सुमारास सूर्योदय झाला होता. त्यापूर्वी सूर्य अर्धवट उगवला होता ('अर्धोदिते दिनकरे'[१४]) तेव्हां गोपालदारक आर्यक शर्विलकाच्या मदतीनें बंदीखान्याच्या अधिकाऱ्यास ठार मारून कैदेंतून सुटतो व आश्रयार्थ सैरावैरा पळूं लागतो. तो वर्धमानकाच्या गाडीजवळ येतो त्या वेळीं त्याच्या शृंखलांचा आवाज ऐकून वर्धमानकाला वसंतसेना गाडींत बसण्यासाठीं आली असें वाटतें व तो तिला " बैलांना नुकतीच वेसण घातल्यामुळें ते आपणांस पुढील बाजूनें बसूं देणार नाहींत, म्हणून आपण मागील बाजूनें बसावें " असें सुचवितो. पुढें वेशीजवळ आल्यावर पोलीस अधिकारी चंदनक व वीरक यांच्यामध्यें गाडी कोणती तपासावी याविषयीं झगडा झाल्यामुळें आर्यक पुष्पकरण्डक-जीर्णोद्यानांत सुखरूप पोंचतो व तेथें चारुदत्ताची गांठ पडल्यावर त्याला शरण जातो, शरणागताला अभय देण्याचा चारुदत्ताचा स्वभाव असल्यामुळें तो त्याला आपल्या गाडींतून इष्ट स्थलीं जाण्यास मदत करतो.

रतिश्रान्त वसंतसेनेला घरीं एकटीच सोडून चारुदत्त पहांटेस निघून गेला, तेव्हां तो तशाच महत्त्वाच्या कामाकरितां गेला असावा, व तें काम म्हणजे पालकराजाला पदच्युत करून आर्यकाला गादीवर बसविण्याचें कारस्थान असावें असा तर्क श्री. लेले यांनीं केला आहे व यासारख्या कांहीं उल्लेखांवरून " मृच्छकटिक' नाटक राजकीय होतें इतकेंच नव्हे, तर खरोखरीच्या घटनांवर आधारलेलें, अतएव ऐतिहासिक होतें" असा निष्कर्ष त्यांनीं काढला आहे. नाटकाला लोकप्रिय करण्याकरितां शूद्रकानें त्याला प्रेमाचें अस्तर दिलें आहे असें त्यांचें म्हणणें आहे. याच्या उलट श्री. बी. काश्यप म्हणतात कीं "इ. स. ६०० च्या पूर्वी रेभिल, शर्विलक, चंदनक, चांडाळ, द्यूतकार इत्यादि निरनिराळया थरांतील माणसांचा राजकारणाशीं संपर्क येत नसल्यामुळें त्यांच्या उठावानें राज्यक्रांति झाली असणें शक्य नाहीं. " या दोन परस्परविरुद्ध मतांचा थोडक्यांत विचार करूं.

' मृच्छकटिक ' नाटक वाचल्यावर त्याचें मुख्य कथानक पालक राजाची पदच्युति हें नसून चारुदत्त व वसंतसेना यांची प्रणयकथा हें आहे हें कोणाच्याहि लक्षांत येईल. ' मुद्राराक्षस ' व ' मृच्छकटिक ' यांची तुलना केली असता ही गोष्ट स्पष्ट होईल. 'मुद्राराक्षसां'-तील प्रत्येक घटना चन्द्रगुप्तावर सूड घेण्यास प्रवृत्त झालेल्या राक्षस नामक अमात्याच्या योजना हाणून पाडून त्याला चंद्रगुप्ताचें अमात्यपद स्वीकारण्यास भाग पाडण्याच्या उद्देशानें घडून आलेली दिसेल. तेव्हां तें नाटक राजकीय आहे, यांत संशय नाहीं. याच्या उलट ' मृच्छकटिकां'तील राज्यक्रांतिविषयक घटना गौण असून त्या तें नाटक सुखान्त करण्याच्या उद्देशानें घातलेल्या दिसतात. तेव्हां ' मृच्छकटिकां'तील मुख्य कथानक चारुदत्त व वसंतसेना यांची प्रणयकथा हें असून त्याला राजकारणाचें अस्तर दिलें आहे यांत संशय नाहीं. अशा प्रकारचें अस्तर केवळ याच नाटकांत नव्हे तर अनेक संस्कृत नाटकांत आढळेल. उदाहरणार्थ, भासाच्या ' स्वप्नवासवदत्तां'तील उदयनाच्या सैन्याचा आरुणि नामक शत्रूवर विजय व त्यायोगें उदयनाला झालेली स्वराज्यप्राप्ति; ' मालविकाग्निमित्रां 'तील अग्निमित्राच्या सेनापतीनें केलेला विदर्भराजाचा पराभव व तदुत्तर विदर्भाची दोन चुलत भावांत वांटणी; ' विद्धशालभञ्जिकें 'त कलचुरि सैन्यानें केलेला कुन्तलाधिपतीचा पराभव व तदनंतर कुन्तल राज्याची वीरपालाला प्राप्ति – या घटनाहि याच प्रकारच्या आहेत. या सर्व नाटकांतील मुख्य कथानक अन्तःपुरांतील प्रेमकलह हें असून त्याला राजकीय घटनांचें अस्तर जोडलें आहे असें दिसून येईल. ' मृच्छकटिकां'तील मुख्य व गौण कथानकांचा संबंध याच तऱ्हेचा आहे. फरक एवढाच कीं त्यांतील प्रणयकथा राजाराणींची नसून सार्थवाह-गणिकांची आहे. आणि त्यामुळेंच त्यांतील राजकीय घटना राजसैनिकांच्या पराक्रमानें घडल्या नसून सामान्य लोकांच्या बंडाळीमुळें उत्पन्न झाल्या आहेत.

'मृच्छकटिकां 'तील राजकीय घटनांचा मुख्य कथानकाशीं संबंध कसाहि असो, पण त्या ऐतिहासिक म्हणजे खरोखरींच घडल्या होत्या काय याचा आतां विचार करूं. या बाबतींत विद्वानांनी भिन्न भिन्न मतें प्रकट केलीं आहेत. मुख्य गोष्ट शर्विलकानें पालक-राजाला ठार मारून ज्याला गादीवर बसविलें तो आर्यक कोण होता ही होय. तो पालक राजाचा भाऊबंद किंवा नातेवाईक असून कोठेंतरी खेडयांत लपून राहत होता असें श्री. लेले म्हणतात, पण त्याचें ह्या राजाशीं

१४ अर्धोदिते दिनकरे गोपालदारकः खुटितः । – ' मृच्छकटिक, ' पृ. १२०.










नक्की नातें त्यांनीं सांगितलें नाहीं. 'मृच्छकटिकां'त आर्यकाला अनेक ठिकाणीं 'गोपालदारक' असें म्हटलें आहे.[१५] याचे दोन अर्थ संभवतात : (१) गोपाल नामक गृहस्थाचा मुलगा, आणि (२) गवळयाचा मुलगा. 'मृच्छकटिकां'तील पालक राजा उज्जैनीस राज्य करीत होता. या नांवाचा एकच राजा इतिहासज्ञांस माहीत आहे. तो उज्जैनीच्या प्रद्योत ऊर्फ चंडमहासेन नृपतीचा मुलगा होता. प्रद्योताला गोपालक व पालक असे दोन मुलगे व वासवदत्ता नामक मुलगी होती. वासवदत्ता ही वत्सराज उदयनाची पट्टराणी. 'मृच्छकटिकां'तील आर्यक हा गोपालकाचा (किंवा गोपालाचा) मुलगा असावा असें कांहीं विद्वानांचें मत आहे. या दोन्ही मुलांचा जेथें निर्देश येतो तेथें गोपालाचें नांव प्रथम येतें. उदाहरणार्थ, 'स्वप्नवासवदत्ता'च्या सहाव्या अंकांतील चंडमहासेनाच्या राणीच्या संदेशांतील खालील वाक्य पहा : 'मम वा महासेनस्य वा यादृशौ गोपालकपालकौ तादृश एव त्वम्।' ('मला व माझे पति महासेन यांना जसे आमचे मुलगे गोपालक व पालक तसाच, उदयना ! तूंहि प्रिय आहेस.') त्याप्रमाणेंच 'कथासरित्सागरां'तील (११,७४–७५) खालील श्लोक पहा— 'जातौ द्वौ तनयौ चण्डमहासेनस्य भूपतेः । एको गोपालको नाम द्वितीयः पालकस्तथा ॥' या उल्लेखांवरून गोपालक हा महासेनाचा वडील मुलगा होता हें स्पष्ट आहे. वत्सराज उदयनानें त्याला विदेह (मिथिला) देशाचें राज्य दिल्याचा 'कथासरित्सागरां'त (१९,५७) उल्लेख आहे. 'बृहत्कथाश्लोकसंग्रहा'त म्हटलें आहे कीं प्रद्योत (महासेन) राजानंतर गोपाल उज्जैनीच्या गादीवर आला, पण त्यानें लवकरच राज्यत्याग करून आपला भाऊ पालक यास गादीवर बसविलें. पालकानें दुष्टपणानें राज्य केलें. शेवटीं त्याला एक दुःस्वप्न पडलें. त्यामुळें आपला मुलगा अवन्तिवर्धन याला गादीवर बसवून त्यानें संन्यासाश्रमाचा स्वीकार केला. बहुतेक पुराणांत प्रद्योतानंतर पालकानें तेवीस वर्षें राज्य केल्याचा उल्लेख आहे ('विष्णुपुराणा'च्या एका प्रतींत मात्र 'पालको' बद्दल 'गोपालको' असा पाठ आहे.) पालकानंतर विशाखयूप व त्यानंतर सूर्यक (कांहीं पाठांत अजक) गादीवर आल्याचें पुराणें सांगतात.[१६] डॉ. देवदत्तपंत भांडारकरांच्या मतें, प्रद्योतानंतर त्याचा धाकटा मुलगा पालक गादीवर आला. पण गोपालाचा मुलगा आर्यक याला राज्यावरील आपला हक्क सोडण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्यानें कारस्थान करून पालकाला पदच्युत करून आपण गादी बळकाविली. त्यांच्या मतें पुराणांतील वंशावळींत नांवांची उलथापालथ झाली असावी. पुराणांत पालक–विशाखयूप–अजक अशी वंशावळ दिली आहे. ती वस्तुतः पालक–अजक–विशाखयूप अशी असावी. अजक हें आर्यक याचें प्राकृत रूप मानून डॉ. भांडारकरांनी पुराणांतील वंशावळीची 'मृच्छकटिकां'तील घटनांशीं सांगड घातली आहे.

वरील विवेचनावरून 'बृहत्कथाश्लोकसंग्रह', 'कथासरित्सागर', पुराणें इत्यादि प्राचीन ग्रंथांत गोपालपुत्र आर्यकाचा निःसंदिग्ध उल्लेख येत नाहीं हें दिसून येईल. त्यामुळें पालकराजाच्या कारकीर्दीच्या अखेरीस खरोखरीच राज्यक्रांति झाली होती काय याबद्दल संशय उत्पन्न होतो. पण 'मृच्छकटिकां'तील उल्लेखांचा काळजीपूर्वक विचार केल्यास शूद्रकाची या क्रांतीविषयीं काय कल्पना होती हें अजमावणें कठीण नाहीं. आर्यकाला बहुतेक ठिकाणीं गोपालदारक म्हटलें आहे व तो घोषांत (गवळीवाड्यांत) राहात होता हेंहि सांगितलें आहे. त्यावरून सकृद्दर्शनींच 'गोपालदारक' याचा अर्थ 'गवळयाचा मुलगा' असा सहजच ध्यानांत येतो. 'गोपालदारक' याचा अर्थ गोपाल नामक मनुष्याचा मुलगा असाहि करणें शक्य आहे खरें, पण तसा अर्थ विवक्षित असता तर एखाद्या ठिकाणीं तरी त्याच्या राजवंशाचा सूचक असा उल्लेख आला असता. शिवाय एका ठिकाणीं तर आर्यक स्वतःचें 'गोपालप्रकृति' असें वर्णन करतो.[१७] गोपाल हा त्याचा पिता असता तर तो त्याचा उल्लेख इतक्या निःस्नेहपणानें करता ना. शिवाय त्याच्या, तसेंच त्याच्या मित्रांच्या भाषणांत त्याचा राज्यावरच्या हक्काचा चुकून सुद्धां उल्लेख आलेला नाहीं. उलट, कैदें-

१५ 'मृच्छकटिकं', पृ. ४३, ८०, ११६, ११८ इ.

१६ पार्जिटर, कलियुगांतील राजवंश, पृ. १९.

१७ शरणागतो गोपालप्रकृतिरार्यकोऽस्मि । – 'मृच्छ.' पृ. १३०.








तून सुटून आल्यावर तो आपल्या स्वगत भाषणांत म्हणतो :

‘ भाग्यानि मे यदि तदा मम कोऽपराधो
यद्वन्यनाग इव संयमितोऽस्मि तेन ॥ ’

( ‘ माझ्या दैवांत जर राज्ययोग लिहिला असेल तर त्यांत माझा कोणता अपराध, कीं ज्यामुळें पालकराजानें मला वन्य हत्तीप्रमाणें जखडून ठेवावें ? ’ )

हे उद्गार अर्थातच राज्यावर पैतृक हक्क सांगणाऱ्या राजपुत्राच्या तोंडीं शोभणार नाहींत. सहाव्या अंकांत आर्यक कैदेंतून निसटून गेल्याची वार्ता समजतांच पोलिस अधिकारी चन्दनक म्हणतो-[१९] ‘ अरे रे वीरक-विशल्यभीमाङ्गददण्डकालदण्डशूरप्रमुखाः,

आगच्छत विश्वस्तास्त्वरितं यतध्वं लघु कुरुत ।
लक्ष्मीर्येन न राज्ञः प्रभवति गोत्रान्तरं गन्तुम् ॥

( ‘ अहो वीरकप्रभृति राजसेवकांनो ! तुम्ही सर्व राजाचे विश्वासू लोक लवकर एकत्र व्हा, आर्यकाला पकडण्याचा प्रयत्न करा, जेणेंकरून राजलक्ष्मी दुसऱ्या वंशांत जाऊं शकणार नाहीं. ’ )

आर्यक हा पालकाचा पुतण्या असता तर तो राजा झाल्यानें राजलक्ष्मी परवंशांत गेली असें कोणी मानलें नसतें. तेव्हा चन्दनकाच्या या उद्गारांवरूनहि आर्यक पालकराजांच्या वंशांतील नव्हता हें उघड आहे.

‘मृच्छकटिकां’तील राज्यक्रांति खरोखरीच झाली होती काय याबद्दल संशय आहे. पण त्या नाटकांतील उल्लेखां-वरून शूद्रकाला ती सामान्य लोकांच्या बंडामुळें घडून आली होती असें दाखवयाचें होतें हें मात्र स्पष्ट आहे. प्राचीन काळीं जनतेनें बंड करून राजाला पदच्युत केल्या-ची किंवा कंठस्नान घातल्याचीं उदाहरणें सहसा सांपडत नाहींत. राज्यक्रांति व्हावयाची ती सामान्यतः परकी राजाच्या स्वारीमुळें, महत्त्वाकांक्षी व बलिष्ठ सरदारांच्या बंडाळीमुळें किंवा सैन्याच्या फितुरीमुळें. पण प्रस्तुत राज्यक्रांति मुख्यतः गवळी, विट, चेट इत्यादि खालच्या दर्जाच्या लोकांच्या बंडाळीमुळें झाली यांत संशय नाही. तिचीं कारणें दोन-( १ ) पालक राजा अन्या-यानें राज्य करीत होता व त्यामुळें तो लोकांना नकोसा झाला होता. ज्यानें शकारासारखा दुष्ट व मूर्ख मनुष्य राष्ट्रीयत्वाच्या उच्चपदावर नेमला होता त्याच्या कारकी-र्दीत लोकांना सुख काय लाभणार ? तेव्हां तो राज्यभ्रष्ट केव्हां होईल असें त्याच्या सेवकांनाहि झालें होतें. ( २ ) तितक्यांत गवळ्याचा मुलगा आर्यक हा राजा होणार असें कोणा सिद्धपुरुषानें भविष्य वर्तविल्यामुळें लोकांना आशेचा किरण दिसूं लागला होता व ते त्याच्या भोंवतीं जमूं लागले होते.[२०] अशा सिद्धादेशांवर तत्कालीन लोकांची मोठी श्रद्धा असे.[२१] सिद्धादेशावरून पद्मावती वत्सराज उदयनाची राणी होणार हें समजल्यावर तो संबंध घडून येण्यासाठीं यौगंधरायणानें किती कारस्थानें केलीं तें ‘ स्वप्नवासवदत्ता’त दाखविलें आहे. अशाच एका सिद्धादेशावरून विदर्भराजकन्या मालविका हिला वर्षभर अज्ञातवासांत राहिल्यावर अनुरूप पतीची प्राप्ति होणार हें माहीत असल्यामुळें, ‘ मालविकाग्नि-मित्रां’तल्या परिव्राजिकेनें विदिशेस तिचें कुलीनत्व प्रकट केलें नव्हतें. इतरहि ‘ रत्नावली’सारख्या संस्कृत-नाटकांत सिद्धादेशावर विश्वास ठेवून मुत्सद्द्यांनीं कारस्थानें रचल्याचे उल्लेख आहेत. तेव्हां गोपालदारक राजा होणार या सिद्धवचनावर लोकांचा विश्वास बसला तर त्यांत आश्चर्य नाहीं. त्याची आकृतीहि राजपदाला अनुरूप अशीच होती. त्याला पहातांच त्याचे हत्तीच्या सोंडेप्रमाणें दीर्घ बाहू, सिंहाच्या-सारखे पुष्ट खांदे; विशाल वक्षःस्थल व लालसर चंचल लांबट डोळे यांयोगें चारुदत्ताचा सकृद्दर्शनींच त्याच्या-विषयीं अत्यंत अनुकूल ग्रह होतो व हा कोणी महात्मा ( थोर पुरुष ) आहे असें त्यास वाटतें. त्याचीं सर्व भाषणें संस्कृतमध्यें दिलीं आहेत. तेव्हां गवळ्यांच्या कुळांत जन्मलेला हा युवक सुसंस्कृत, भव्य शरीरयष्टि असलेला, शूर व धाडसी होता यांत संशय नाहीं. चंदनकाकडून तरवार मिळाल्यावर व चारुदत्ताच्या सेवकाकडून बेडी

१८ ‘ मृच्छकटिक ’, पृ. ११७. १९ ‘ मृच्छकटिक ’, पृ. ११९.

२० ‘ कथितं च ममप्रियवयस्येन शर्विलकेन यथा किल आर्यकनामा गोपालदारकः सिद्धादेशेन समादिष्टो राजा भविष्यति । सर्वश्चास्मद्विधो जनस्तमनुसरति । ’ ‘ मृच्छकटिक ’, पृ. ४३.

२१ “ न हि सिद्धवाक्यान्युत्क्रम्य गच्छति विधिः सुपरीक्षितानि ” हे ‘ स्वप्नवासवदत्तां’तील यौगंधरा-यणाचे शब्द पहा.






काढली गेल्यावर त्यानें शर्विलकानें चालू केलेल्या दंगलींत स्वतः भाग घेतला व यज्ञवाटांत शिरून दुरात्म्या पालकाला कंठस्नान घातलें.[२२] अशा शूर व धाडसी युवकाला लोकांचें पाठबळ मिळाल्यावर त्यानें प्रत्यक्ष राजावर हल्ला करावा यांत आश्चर्य नाहीं. तशांत पालक-राजाला चांगल्या मंत्र्यांचें साहाय्य नव्हतें व त्याची सेनाहि सज्ज नव्हती.[२३] तशांत तो त्या वेळीं यज्ञ करण्यांत गुंतलेला अत एव निःशस्त्र होता. अशा परिस्थितींत आर्यकानें आपल्या निवडक शूर लोकांच्या साहाय्यानें राजावर एकाएकीं हल्ला करून त्याला यज्ञवाटांतच यमसदनीं पाठविलें असलें तर त्यांत आश्चर्य नाहीं.

तेव्हा सामान्य लोकांच्या उठावामुळें उज्जयिनींत राज्यक्रांति झाली असें शूद्रकास दाखवावयाचें होतें यांत संशय नाहीं. पण या कारस्थानांत चारुदत्ताचा हात होता असें दिसत नाहीं. वादळानंतरच्या पहांटेस चारुदत्त वसंतसेनेस सोडून गेला तें कारस्थानाच्या सिद्धीकरितां नव्हे, तर पुष्पकरंडक – जीर्णोद्यानांत तो दिवस मैत्रेय व वसन्तसेना यांच्या सहवासांत मजेंत घालवावा या हेतूनें तेथील व्यवस्था करण्यास. अशा रीतीनें एखादा दिवस मजेंत घालविण्याकरितां नागरक उत्तम वस्त्रालंकार धारण करून घोड्यावर बसून सकाळीच घरून निघत आणि वेश्या, परिचारक इत्यादिकांसह उद्यानांत जात. तेथें कोंबडे, बोकड इत्यादिकांच्या टकरा, द्यूत, नाटकप्रयोग, खेळ इत्यादिकांत आनंदानें काळ घालवून सायंकाळीं घरीं परत येत. येतांना त्या उद्यानांतील आपल्या क्रीडेचें स्मृतिचिह्न बरोबर नेत, असें वात्स्यायनाच्या कामसूत्रांत वर्णिलें आहे[२४]. अशा उद्यानयात्रेची आगाऊ व्यवस्था करण्याकरतांच चारुदत्त पहांटे उठून मैत्रेयासह पुष्पकरंडक – जीर्णोद्यानांत गेला होता व वसंतसेना निजून उठल्यावर तिला तेथें घेऊन येण्याविषयीं त्यानें आपल्या वर्धमानक चेटाला सांगितलें होतें. तेथें बराच वेळ वाट पाहून झाल्यावर आपली गाडी कां आली नाहीं याविषयीं अनेक तर्कवितर्क त्याचे मनांत येतात (अंक ७, श्लो. २). शेवटीं गाडी आल्यावर तींत बसलेल्या आर्यकास पाहिल्यावर त्यास साहजिकच आश्चर्य वाटतें. आपण आर्यक नामक गवळी असून शरण आलों आहों असें त्यानें सांगतांच त्याला पालकराजानें बंदीवासांत टाकल्याच्या वार्तेची त्यास आठवण होते व तो शरणागताला अभय देतो आणि आपल्या गाडींतून त्याला इष्टस्थळीं पोचवितो. या प्रवेशावरून चारुदत्ताचें या कारस्थानांत मुळींच अंग नव्हतें हें उघड आहे.

" चारुदत्ताजवळ तीन पिढ्यांची गडगंज संपत्ति होती पण त्याच्या हातांत कारभार आल्यावर त्यानें ती थोड्याच वर्षांत संपविली. ही संपत्ति केवळ दानधर्मांत संपलेली दिसत नाहीं. तो जुगारी असल्याचाहि उल्लेख नाहीं. तेव्हा त्यानें पालकाला पदच्युत करण्याच्या कारस्थानांत आपल्या देणग्यांचा वर्षाव केला असला पाहिजे " असा तर्क श्री. लेले यांनीं केला आहे , पण तो बरोबर नाहीं. याविषयीं 'मृच्छकटिक' काय म्हणतें तें पाहूं. त्या नाटकांत चारुदत्त अनेक प्रसंगीं देणग्यांची खैरात करतांना दिसतो. कोणी कांहीं शूर कृत्य केलं किंवा कांहीं आनंददायक वार्ता कळविली कीं त्याला पारितोषिक ठेवलेलेंच. अशा देणग्यांत कुबेराची सपत्तीहि पुरी पडली नसती. याशिवाय चारुदत्तानें अनेक धार्मिक व लोकोपयोगी कृत्यें केलीं होतीं. नवव्या अंकांत वसंतसेनेला दागिन्यांच्या लोभानें ठार मारल्याचा आरोप त्याच्यावर ठेवला जातो तो ऐकून मैत्रेय उद्गारतो : ' अहो सद्गृहस्थहो ! ज्यानें अनेक अग्रहार स्थापिले, विहार, आराम, देवालयें बांधलीं, तळीं, विहिरी खोदविल्या, यज्ञयूप उभारले व अशारीतीनें ही उज्जयिनी नगरी विभूषित केली, तो अशा तऱ्हेचें पापकृत्य क्षुल्लक धनाच्या लोभानें करील काय ? '. याउद्गारांवरून चारुदत्ताच्या दारिद्र्याचें कारण पालकराजाला पदच्युत करण्याच्या कारस्थानाला केलेली आर्थिक मदत हें नसून त्याचीं धार्मिक व लोकोपयोगी कृत्यें व दानशील स्वभाव होय हें उघड आहे.

चारुदत्ताचा या कारस्थानांत हात नव्हता, तसेंच पालकाच्या कारकीर्दीच्या अखेरीस अशी राज्यक्रांति झाल्याचा यत्किंचित्‌हि पुरावा प्राचीन काळच्या ग्रंथांत

२२ ' आर्यकेणार्यवृत्तेन कुलं मानं च रक्षता । पशुवद्यज्ञवाटस्थो दुरात्मा पालको हतः ॥ ' ( ' मृच्छ. ' पृ. २०५ ).

२३ ' हत्वा रिपुं तं बलमन्त्रहीनम् ' इत्यादि शर्विलकाचे उद्गार पहा – ' मृच्छकटिक ' पृ. २०५.

२४ कामसूत्र, पृ. ४७.










सांपडत नाहीं हें आपण पाहिलें आहे. पण राज्यक्रांतीची कल्पना शूद्रकाला स्वकालीन एखाद्या ऐतिहासिक घटनेवरून सुचली असणें अशक्य नाहीं. 'मृच्छकटिक' नाटक, त्यांतील भाषा, धार्मिक परिस्थिति इत्यादि प्रमाणांवरून खिस्ती शकाच्या आरंभींच्या दोन-तीन शतकांत लिहिलें गेलें असावें, असें अनेक विद्वानांचें मत आहे. 'मृच्छकटिकां'त वर्णिली आहे त्या प्रकारची राज्यक्रांति खिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास झाली होती असें पुराणांतील उल्लेख, कोरीव लेख वगैरे प्रमाणांवरून आतां निश्चित झालें आहे. इ. स. २५० च्या सुमारास दक्षिणेंतल्या विशाल सातवाहन–साम्राज्याचा अस्त झाला आणि त्याच्या जागीं दक्षिणेंत अनेक लहान लहान राज्यें उत्पन्न झालीं. त्या काळीं उत्तर महाराष्ट्र, गुजराथ व कोंकण या प्रदेशावर आभीरांची सत्ता पसरली. आभीरनृपति ईश्वरसेन याच्या काळचा एक कोरीव लेख नाशिकच्या लेण्यांत अद्यापि विद्यमान आहे. त्यांत ईश्वरसेनाला 'राजा' ही पदवी लावली आहे. पण त्याच्या पित्याचा ' शिवदत्त आभीर ' असा पदवीविरहित नामोल्लेख केला आहे. त्यावरून ईश्वरसेन हा अगदी सामान्य आभीर कुळांत जन्मला होता हें स्पष्ट दिसतें. पुराणांतील वर्णनाप्रमाणें, दहा आभीर राजांनीं ६७ वर्षें राज्य केलें. [२५] ही वर्षसंख्या दहा राजांच्या राजवटींच्या मानानें कमी वाटते. वायुपुराणाच्या एका प्रतींत दिलेली १६७ वर्षें ही संख्या जास्त संभवनीय आहे. या आभीरांनीं आपला स्वतःचा संवत्सर सुरू केला. तो पुढें महाराष्ट्र, कोंकण व गुजराथ या प्रदेशांत जवळजवळ पांचशें वर्षें चालू होता. आभीर म्हणजे अहीर किंवा गवळी. महाराष्ट्रविदर्भांत गवळी लोकांचें पूर्वीं राज्य होतें अशी समजूत अद्यापि प्रचलित आहे ती या आभीरांच्या राजवटीमुळें उत्पन्न झाली असावी. डॉ. स्टेन कोनो यांच्या मतें तर आभीरवंशस्थापक ईश्वरसेन हाच शूद्रक होय; त्यानें मृच्छकटिक नाटकांत आपण केलेल्या राज्यक्रांतीचा उल्लेख केला आहे.[२६] हें मत आपण स्वीकारलें नाहीं तरी ' मृच्छकटिक ' नाटकाच्या कर्त्याला गोपालदारक आर्यकानें केलेल्या राज्यक्रांतीची कल्पना आभीरराज्यस्थापनेवरून सुचली असणें अशक्य नाहीं. तसें असल्यास ' मृच्छकटिक ' नाटकाचा काळ खिस्तोत्तर तृतीय शतकाचा उत्तरार्ध हा मानतां येईल.

शेवटीं ' मृच्छकटिकांती'ल शेवटच्या अंकांतील घटनांचा कालनिर्णय करून हा लांबलेला लेख पुरा करूं.

' मृच्छकटिका'च्या सहाव्या, सातव्या व आठव्या अंकांतील घटना एकाच दिवशीं वैशाख शुक्ल दशमीस घडल्या होत्या. त्या दिवशीं वसन्तसेनेला मारून शकार सायंकाळीं पुष्पकरंडक–जीर्णोद्यानांतून परत येतो. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो न्यायालयांत चारुदत्तावर फिर्याद गुदरण्यास जातो. त्याच वेळीं चन्दनकानें लत्ताप्रहार केल्यामुळें अपमानित झालेला वीरक न्यायालयांत येतो. तो म्हणतो, ' चंदनकानें केलेल्या माझ्या अपमानाचें शल्य माझ्या मनांत असल्यामुळें मी कशीबशी गेली रात्र घालविली. ' तेव्हा नवव्या अंकांतील शकाराची चारुदत्तावरील फिर्याद वैशाख शुद्ध एकादशीस गुदरली गेली असें दिसतें. त्याच दिवशीं तिचा निकाल लागून चारुदत्त दोषी ठरतो व राजा त्याला सुळावर चढविण्याची आज्ञा करतो.

शेवटच्या दहाव्या अंकांतील घटना याच्याच पुढल्या दिवशीं वैशाख शुद्ध द्वादशीस सकाळीं घडल्या असाव्या. सकाळीं चारुदत्ताला घेऊन चांडाल स्मशानाकडे जात असतां, इकडे शर्विलक, चन्दनक, दर्दुरक इत्यादि मित्रांच्या साहाय्यानें गोपालदारक आर्यक राजवाड्यावर चाल करतो व यज्ञवाटांत शिरून तेथें असलेल्या पालक–राजाला कंठस्नान घालतो. शर्विलक लागलीच आर्यकाला गादीवर बसवून त्याच्या नांवें दंवडी पिटवितो व पौरजनांना शांतता व सुव्यवस्था यांचें आश्वासन देतो. नंतर तो चारुदत्ताला सोडविण्यासाठीं स्मशानाकडे त्वरेनें जातो. तेथें सर्वांची भेट होऊन ते आर्या धूता अग्निप्रवेश करणार त्या ठिकाणीं जातात व तिला वांचवितात.

या प्रमाणें ' मृच्छकटिक ' नाटकांतील संविधानक चैत्र कृष्ण षष्ठीस सुरू होऊन वैशाख शुक्ल द्वादशीस समाप्त झालें. तेव्हां त्या सबंध नाटकांतील घटना घडण्यास एकूण बावीस दिवस लागले असावेत.

२५ ' सप्तषष्टिंच वर्षाणि दशाभीरास्ततो नृपा ॥ ' पार्जिटर, कलियुगांतील राजवंश, पृ. ४६.

२६ 'अवन्तिसुन्दरीकथा' नामक दण्डिकृत गद्यकाव्याचें अपूर्ण हस्तलिखित कांही वर्षांपूर्वी सांपडलें होतें. त्यांत शूद्रकानें आपल्या ग्रंथांत स्वचरित्र वर्णिल्याचा उल्लेख आहे ' शूद्रकेणासकृज्जित्वा स्वच्छया खड्गधारया । जगद् भूयोऽप्यवष्टब्धं वाचा स्वचरितार्थया ॥ '










प्रा. देविदास दत्तात्रेय वाडेकर

# स्वप्नांचें मानसशास्त्र

## चार प्रश्न

या लेखांत खालील चार प्रश्नांचीं उत्तरें द्यावयाचीं आहेत. ( १ ) स्वप्नें कां पडतात ? ( २ ) जागेपणींच्या मानसिक अवस्थेशीं स्वप्नांचा कांहीं संबंध असतो काय ? ( ३ ) तसेंच, स्वप्नांचा शारीरिक प्रकृतीशीं कांहीं संबंध असतो काय ? ( ४ ) स्वप्नें हीं भविष्य-सूचक असतात असें म्हणतात तें कितपत खरें आहे ?

## स्वप्न म्हणजे काय ?

स्वप्नें कां पडतात, म्हणजे स्वप्नांचीं कारणें कोणतीं ? —या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं स्वप्न म्हणजे काय याची माहिती करून घेतली पाहिजे. स्वप्न ही एक मानसिक जीवनाची अवस्था आहे. संपूर्ण जागेपण आणि गाढ झोंप यांच्यामधील ही अवस्था आहे. जागेपणीं शरीराच्या अंतर्बाह्य इंद्रियद्वारां मनावर अनेक संस्कार घडत असतात, व त्याद्वारां स्वतःच्या शरीराच्या स्थितीचें व बाह्य जगांतील वस्तूंचें ज्ञान होत असतें; आणि त्यांविषयीं आपल्या मनांत सुखदुःखाच्या भावना व तदनुरूप मानसिक प्रेरणा अथवा शारीरिक क्रिया उत्पन्न होत असतात. उदाहरणार्थ, शरीरांतर्गत इंद्रियद्वारां आपणांस पोट भरल्याची जाणीव होत असते, अथवा नेत्रांच्या द्वारां एखादा देखावा दिसत असतो; व या अनुभवानुरूप आपणांस आनंद किंवा समाधान होत असतें व तो अनुभव चालू ठेवण्याची प्रेरणा होत असते. गाढ झोंपेंत ही इंद्रियांवर संस्कार घडण्याची क्रिया अजिबात बंद असते, किंवा निदान प्रत्यक्ष भौतिक दृष्ट्या ती क्रिया होत असली तरी तिचा मनावर परिणाम होत नाहीं; व म्हणून त्या वेळीं आपले मनोव्यापारहि संपूर्णपणें बंद असतात. इंद्रियद्वारां मनावर होणारे संस्कार संपूर्णपणें बंद झाले कीं झोंप आलीच ! किंबहुना, इंद्रियांवर संस्कार होण्याची क्रिया बंद करणें ही झोंप आणविण्याची एक परिणामकारक युक्ति आहे. त्यासाठींच झोंपेच्या वेळीं काळोख करणें किंवा शांतता राखणें या गोष्टी झोंपेस इष्ट असतात. अशा तऱ्हेनें जागेपण आणि झोंप या दोन अवस्थांच्या मधील मनोव्यापार किंवा मानसिक अवस्था ही स्वप्नानुभवाची अवस्था होय.

## जागेपण आणि स्वप्न यांतील भेद

स्वप्नांमधील मनोव्यापार हे जागेपणींच्या मनोव्यापारांहून फारच भिन्न असतात. ( १ ) जागेपणींच्या मनोव्यापारांस बाह्य किंवा शरीरांतर्गत इंद्रियांवर होणाऱ्या विषयांच्या संस्काराचा आधार असतो. निदान ते या विषयसंस्कारांच्या आकलनापासून सुरू होतात व बहुशः त्यांच्याभोंवतींच घुटमळत असतात. परंतु स्वप्नानुभवांचें तसें नाहीं. त्यांना इंद्रियसंस्कारक विषय असत नाहींत. त्यांचे विषय सर्वस्वीं काल्पनिक स्वरूपाचे असतात. ( २ ) जागेपणींच्या अनुभवांसंबंधीं अनेक व्यक्तींचें एकमत होऊं शकतें एकास जें दिसतें किंवा ऐकूं येतें तेंच दुसऱ्यास दिसतें किंवा ऐकूं येतें. परंतु स्वप्नानुभवांचें तसें नाहीं. एकास जो स्वप्नानुभव येईल तोच दुसऱ्यास येईल असें नाहीं. म्हणजे एकास जें स्वप्नांत दिसेल किंवा ऐकूं येईल तेंच दुसऱ्यास दिसेल किंवा ऐकूं येईल असें नाहीं. ( ३ ) जागेपणींच्या अनुभवां-अनुभवांत जे ठरलेले क्रम ( order ) किंवा जीं साहचर्यें ( associations ) असतात त्यासारखे क्रम किंवा साहचर्यें स्वप्नानुभवांत असत नाहींत. जागेपणीं मनुष्यास पंख असून तो आकाशांत उडत आहे, अशा प्रकारचें साहचर्य कधींहि

[ या लेखाच्या आरंभीं नमूद केलेले चार प्रश्न लेखकास 'पुणें नभोवाणीकेंद्रा'वरील मराठी 'ब्रेन्स ट्रस्ट' ( 'जिज्ञासूंचें समाधान' ) या कार्यक्रमांत ( ता. २९ । ७ । १९५५ ) विचारण्यांत आले होते. त्यावेळीं त्या प्रश्नांस त्यानें दिलेल्या तोंडीं उत्तरांत फारच थोडें विवेचन येऊं शकलें परंतु या प्रश्नांच्या अनुषंगानें लेखकानें त्या कार्यक्रमानंतर मुद्दाम तयार केलेलें त्यासंबंधींचें समग्र विवेचन या लेखांत देण्यांत आलें आहे. या दृष्टीनें हा लेख बहुतांशीं वेगळाच आहे. तथापि त्याच्याहि प्रसिद्धीस पुणें 'नभोवाणी केंद्रा'ची परवानगी घेतली आहे. ]










दिसत नाहीं. परंतु स्वप्नानुभवांत तें दिसूं शकेल. किंबहुना, स्वप्नांत आपल्या जागेपणींच्या अनुभवांचीं साहचर्यें खूपच बिघडून गेलेलीं असतात. आणि म्हणून स्वप्नांत कुत्र्याचा पाय मांजराला, तर मांजराचा कोल्ह्याला, अशी अनुभवांची सरमिसळ होऊन असंभाव्य किंवा चमत्कारिक गोष्टी आपणांस प्रतीत होत असतात. (४) जागेपणींच्या अनुभवांची सत्यता किंवा यथार्थत्व याबद्दल त्या अनुभवांच्या वेळीं जी आपली श्रद्धा असते ती ते अनुभव संपून गेल्यानंतरसुद्धां कायम राहाते. परंतु स्वप्नांतील अनुभवांसंबंधानें तशी स्थिति नाहीं. ते अनुभव प्रत्यक्ष घडत असतांना ते अगदीं सत्य वाटतात. त्यासंबंधानें कसलीहि शंका येत नाहीं. परंतु त्या अनुभवांतून आपण जागे झाल्यानंतर त्या संबंधींचा सत्याभास अजिबात नाहींसा होतो व आपण फसलों हें लक्षांत येतें.

## थोडें मानसशास्त्रीय विवेचन : वस्तुसंवेदन

स्वप्नांचें मानसशास्त्रीय स्वरूप थोडी मानसशास्त्रीय परिभाषा वापरून अधिक रेखीवपणें सांगतां येईल. आपल्या जागेपणींच्या जीवनांतील अनुभवांत मुख्य भाग आपल्या इंद्रियद्वारां बाह्यसृष्टींतील विविध वस्तूंचें जें आपणांस आकलन होत असतें त्याचा असतो. उदाहरणार्थ, नेत्रद्वारां समोरील झाड किंवा घर ह्यांचें आपणांस आकलन होतें. यास मानसशास्त्रांत वस्तुसंवेदन ( perception of things ) किंवा केवळ संवेदन असें म्हणतात. ह्या आकलनांत वस्तुतः दोन घटक असतात. एक, इंद्रियद्वारां होणारें केवळ गुणांचें आकलन ( उदाहरणार्थ, विशिष्ट आकाराचा हिरव्या किंवा पिवळ्या रंगाचा ठिपका ); दुसरा, त्या आकलित गुणावरून मनानें आकलिलेली वस्तु ( उदाहरणार्थ, झाड अगर घर ). अनुभवांत आपणांस प्रत्यक्ष दिलेला असतो फक्त इंद्रियगम्य गुण ( sensible quality ); व त्यावरून अर्थ लावून मन समजतें वस्तु ( thing ); आणि हेंच वस्तुसंवेदन.

## वेदन व त्याचें विवरण:

### वस्तुसंवेदन व अप-वस्तुसंवेदन

वस्तुसंवेदनांतील ( perception ) या दोन घटकांस मानसशास्त्रांत अनुक्रमें गुणवेदन किंवा केवळ वेदन ( sensation ) आणि त्याचें विवरण ( its interpretation ) असें म्हणतात. यावरून बाह्यसृष्टीच्या आपल्या अनुभवांतसुद्धां आपल्या मनाच्या समजुतीचा बराच भाग असतो असें दिसून येईल. इंद्रियद्वारां बाह्य विषयांचा होणारा मनावरील गुणवेदनाचा संस्कार हाच आपल्या बाह्यसृष्टीच्या ज्ञानाचा म्हणजे संवेदनाचा मूलाधार खरा; परंतु त्या मूलाधारावर मन प्रत्यक्ष वर्तमान इंद्रियसंस्कारांत न दिलेला परंतु अवशेषसंस्कारांच्या रूपानें मागें राहिलेल्या आपल्या पूर्वानुभवांचा मालमसाला खूपसा वापरून स्वतःचे इमले बांधीत असतें. दिलेला अमुक प्रकारचा रंगाचा ठिपका म्हणजे झाड, तमुक प्रकारचा ठिपका म्हणजे घर, अशीं पूर्वानुभवांतील साहचर्यें ( associations ) मनांत अजाणतां उभीं राहून तदनुरूप प्रत्यक्ष वर्तमान ठिपक्यांचे अर्थ मन लावीत असतें. हे लावलेले अर्थ बहुधा बरोबर असतात, व या बिनचूकपणाचें प्रत्यंतर नंतरच्या अनुभवांत येतें. ठिपक्याचा घर म्हणून अर्थ समजल्यानंतर त्या घरांत प्रत्यक्ष प्रवेश करतां येतो तर त्याचा झाड म्हणून अर्थ समजल्यावर त्यास स्पर्श करतां येतो. ही कृति अपेक्षप्रमाणें घडल्यास वेदनाचा अर्थ बरोबर आहे असें आपण समजतों. पण तसें न घडल्यास म्हणजे घरांत प्रवेश करूं जातां, प्रवेश न होतां डोक्यास धक्का लागला तर तें घर नसून घराचें किंवा दरवाज्याचें भिंतीवरील चित्र आहे हें आपल्या लक्षांत येतें. म्हणजे ठिपक्याच्या 'वेदना'वरून घराचें झालेलें संवेदन हें खरें किंवा यथार्थ संवेदन नसून तें खोटें किंवा अयथार्थ संवेदन म्हणजेच अपवस्तुसंवेदन किंवा अपसंवेदन ( wrong perception or illusion ) आहे हें आपल्या ध्यानांत येतें. अपसंवेदनांतसुद्धां संवेदनाप्रमाणेंच वेदन व त्याचें विवरण हे दोन घटक असतातच फरक एवढाच कीं, संवेदनांतील वेदनाचें विवरण हें यथार्थ किंवा बरोबर असतें, तर अपसंवेदनांतील वेदनाचें विवरण अयथार्थ किंवा चुकीचें असतें. संवेदन व अपसंवेदन या दोन्हींस वेदनाचा मूलाधार लागतोच; फक्त एकांतील त्यावरील मनाचे इमले यथार्थ असतात, तर दुसऱ्यांतील ते इमले अयथार्थ असतात.

## अवस्तुसंवेदन

वस्तुसंवेदन व अपवस्तुसंवेदन यांशिवाय अवस्तुसंवेदन ( hallucination ) म्हणूनहि जागेपणींच्या अनुभवांचा एक विशेष प्रकार आहे. या अनुभवांत नसलेली वस्तु आपणांस प्रतीत होते, म्हणजे भ्रम होतो. कावीळ झालेल्यांस सगळें पिवळें दिसतें. किंवा










डोळ्यावर मार लागल्यास डोळ्यांपुढें काजवे दिसतात, किंवा खूप ताप आलेल्यांस आपणांस अंतराळांत उचंललेल्यासारखें वाटतें, किंवा कांहीं रोगांत अन्नांत टांचण्या किंवा अंथरुणांत उंदीर दिसतात. हे सर्व भ्रम होत. त्यांत नसलेलें प्रतीत होतें, अवस्तूचें संवेदन होतें. या अवस्तुसंवेदन-अनुभवांत बाह्यवस्तूंचा किंवा विषयांचा इंद्रियांवर संस्कार झालेला नसतो. तरीसुद्धां जणूं काय असा संस्कार झालेलाच आहे अशासारखा घन प्रत्यय येतो, संवेदन होतें. हें कसें घडतें ? या अनुभवांतहि त्यांतील वेदन-घटक व विवरण-घटक असा भेद केल्यास हा त्याचा वेदन-घटक प्रत्यक्ष इंद्रियसंस्काराभावीं कोठून येतो ? त्याचें उत्तर असें कीं एरवींच्या वस्तुसंवेदनांत बाह्य संस्कारकाच्या ( external stimulus ) इंद्रियांवरील संस्कारानें ( stimulation of the sense-organ ) अंतर्वाहक नसांच्या ( afferent nerves ) द्वारें मेंदूंत ( मज्जासंस्थेंत ) जी चेतना ( excitement ) उत्पन्न होते, तीच मज्जा-चेतना अवस्तुसंवेदनांत बाह्य-संस्काराच्या अभावींहि प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें आपणहून उत्पन्न होते; व तीमुळें मनास वेदन-घटक पुरवला जाऊन अपवस्तुसंवेदनाप्रमाणें त्याचें विकृत विवरणहि मनांत उभें रहातें. व हें विवरण म्हणजेच भ्रम वा अवस्तुसंवेदन. म्हणजे वस्तुसंवेदन, अपवस्तुसंवेदन व अवस्तुसंवेदन या तीनहि प्रकारच्या अनुभवांची मानसशास्त्रीय रचना व त्यांचे मानसशास्त्रीय घटक सारखेच असतात. या तीनहि प्रकारच्या अनुभवांत एक वेदन-घटक व दुसरा विवरण-घटक—असे द्विविध घटक असतात. मात्र त्यांपैकीं वस्तुसंवेदनांत व अपवस्तुसंवेनांत वेदन-घटक हा प्रत्यक्ष इंद्रियसंस्कारामुळें मनास पुरविला जातो व त्याचेंच सद्विवरण वस्तुसंवेदनांत होतें व असद्विवरण किंवा अपविवरण अपवस्तुसंवेदनांत होतें. उलट, अपवस्तुवेदनांत प्रत्यक्ष इंद्रियसंस्कार घडला नसतांना सुद्धां केवळ केंद्रीय मज्जासंक्षोभामुळेंच वेदन-घटक निर्माण होऊन पुढें त्याचेंच अपविवरण होतें. म्हणजे वस्तुसंवेदन व अपवस्तुसंवेदन हे अनुभव सीमेंद्रिय-संस्करणानें ( peripheral stimulation ) उत्पन्न होणारे असून अपवस्तुसंवेदन हा अनुभव मात्र केवळ केंद्रमज्जा-संस्करणानें ( central stimulation ) उत्पन्न होणारा आहे.

### स्वप्न हें अवस्तुसंवेदन किंवा अपवस्तुसंवेदन

वस्तुसंवेदन, अपवस्तुसंवेदन व अवस्तुसंवेदन या अनुभवांचें हें मानसशास्त्र लक्षांत घेतलें, तर त्यांत स्वप्नसंवेदनाचा अनुभव कोठें बसतो हा प्रश्न आतां विचारला पाहिजे. या प्रश्नाचें उत्तर असें:—स्वप्नांतील संवेदन-अनुभवास बाह्य संस्करणाचा आधार बहुतेक वेळां नसतो, पण क्वचित् असतोही. तो कसा नसतो व क्वचित् कसा असतो याचें विशेष विवेचन पुढें येणारच आहे. तूर्त एवढेंच नमूद करणें पुरें कीं स्वप्नांचे बहुतेक अनुभव बाह्यसंस्कार उपस्थित नसतांना केवळ केंद्रीयमज्जाचेतनेनें उत्पन्न झालेले असतात, व हे स्वप्नानुभव अवस्तुसंवेदनासारखे असतात; तर कांहीं थोडे स्वप्नानुभव हे सीमेंद्रियचेतनेनें उत्पन्न झालेले असतात, व हे स्वप्नानुभव अपवस्तुसंवेदनासारखे असतात. मात्र स्वप्नें हीं जागेपणींच्या अपवस्तुसंवेदन किंवा अवस्तुसंवेदन या अनुभवांपेक्षां वेदन-विवरणाच्या बाबतींत अधिकच विकृत असतात असें म्हटलें पाहिजे. असो.

### स्वप्नें कां पडतात ? – पूर्वसंस्कारजागृति व वर्तमान इंद्रियसंस्कार

वरील विवेचनावरून स्वप्नानुभवाचें सामान्य स्वरूप लक्षांत येईल. आतां हीं स्वप्नें कां पडतात या आपल्या पहिल्या प्रश्नाकडे वळूं. प्रथमतः हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं झोंपेच्या वेळीं इंद्रियांवरील संस्कार बंद असले तरी मनावर जागेपणीं झालेले संस्कार अवशेषरूपानें शिल्लकच असतात. या अवशेषरूप संस्कारांच्या तीव्रतेमुळें मनुष्य झोंपेंत असला तरी झोंपेचा गाढपणा कोणत्याहि कारणामुळें थोडासुद्धां कमी झाल्यास हे मनावरील अवशेष-संस्कार कार्यप्रवण होतात व त्यामुळें मानसिक जीवनाचा व्यापार झोंप न मोडण्याइतक्या मंद स्वरूपांत सुरूं होऊं शकतो, व या व्यापाराचेंच नांव स्वप्न ! झोंपेच्या अवस्थेंत नवीन इंद्रियसंस्कार न होतां केवळ मनावरील पूर्वसंस्कारांच्या पुनर्निर्मितीमुळें सुरूं झालेला मनोव्यापार हा स्वप्नांचा एक प्रकार होय; व त्याचें कारण ही जागृतावस्थेंतील मानसिक पूर्वसंस्कारांची पुनर्निर्मिति !

स्वप्नांचें आणखीहि एक कारण असूं शकतें; आणि तें म्हणजे झोंपेच्या अवस्थेंतहि शरीराच्या अंतर्बाह्य इंद्रियांवर होणारे संस्कार. झोंपेच्या अवस्थेंत इंद्रियां-











वरील संस्कार बंद असतात किंवा ते परिणामकारक असत नाहींत, असें वर म्हटलें; पण तें सर्वस्वीं खरें नाहीं. विशेषतः झोंपेची विरळ अवस्था असतांना इंद्रियांवर परिणामकर संस्कार होऊं शकतात; व ते संस्कार पर्यायानें मनावरहि होऊन झोंप न मोडतां-सुद्धां मानसिक जीवन सुरूं होऊं शकतें; व हें मानसिक जीवन म्हणजे स्वप्नांचा दुसरा प्रकार; आणि या प्रकाराचें कारण झोंपेच्या अवस्थेंत इंद्रियांवर होणारे संस्कार !

तेव्हां स्वप्नें ( १ ) इंद्रियसंस्कार न होतांहि, झोंपेच्या विरळ अवस्थेंत होणाऱ्या मनावरील जागेंपणींच्या पूर्वसंस्कारांच्या जागृतीमुळें आणि ( २ ) झोंपेंतहि परिणामकर होणाऱ्या परंतु झोंप न मोडणाऱ्या वर्तमान इंद्रियसंस्कारांमुळें, – अशा दोन कारणांमुळें पडतात.

स्वप्नांच्या या दोनहि कारणांचें थोडें अधिक विवेचन केलें पाहिजे. या विवेचनांतच आपल्या दुसऱ्या आणि तिसऱ्या प्रश्नांचीं उत्तरें येऊन जातील.

## पूर्वसंस्कारांचे व तज्जन्य स्वप्नांचे प्रकार

स्वप्नांची निर्मिति करणाऱ्या पूर्वसंस्कारांचा विचार करतां असें आढळतें कीं हे पूर्वसंस्कार मनावर मूळ जागेंपणींच्या अनुभवांत झालेले असतात व त्या वेळीं मूळ घडणाऱ्या ह्या संस्कारांचे अनेक प्रकार असतात व तदनुरूप या प्रकारच्या स्वप्नांचे उपप्रकार पडतात. स्थूलमानानें त्यांचे खालील चार प्रकार सांगतां येतील :

( अ ) जागेंपणींच्या जीवनांतील एखादा मूळ अनुभव ( उदाहरणार्थ, एखादी मोठी किंकाळी किंवा डोळे दिपवणारा प्रकाश ) मनावर एवढा जबरदस्त आघात करील, कीं त्या आघाताचा मनावरील संस्कार बराच काळपर्यंत ताजा राहील. हा मनावरील संस्कार मूळ संस्कारक विषय नाहींसा झाल्यानंतरहि जागृता-वस्थेंत सुद्धां पुनःपुन्हां निर्माण होऊं शकतो. तीच ती किंकाळी, किंवा तोच तो प्रकाशाचा झोत पुनःपुन्हां मनापुढें येईल. असा हा मूळचा जबरदस्त संस्कार झोंपेच्या विरळ अवस्थेंत मनांत पुन्हां निर्माण होऊन स्वप्नाचें स्वरूप धारण करूं शकेल. अशा स्वरूपाच्या स्वप्नांस पुनर्निर्मिति-स्वप्नें [ Revival Dreams ] असें म्हणतां येईल.

( आ ) जागेंपणींच्या जीवनांतील एखादा मूळ अनुभव ( उदाहरणार्थ, एखाद्या प्रिय जनाचा मृत्यु, नवबालकाचा जन्म, नोकरींत बढती किंवा मोठा सन्मान ) भावभावनांनीं व्यक्तिजीवनाशीं एवढा निकटपणें निगडित असेल व त्यामुळें मनावर एवढा खोल भावना-संस्कार करूं शकेल कीं त्याचीहि पुन-र्निर्मिति नंतरच्या जागेंपणींच्या जीवनांत किंवा झोंपें-तील स्वप्नजीवनांत मूर्तस्वरूप धारण करूं शकेल. अशा तऱ्हेची मूळ संस्काराची होणारी ही पुनर्निर्मिति, विशेषतः त्या मूळ संस्कारांशीं निगडित असलेल्या बलिष्ठ भाव-भावनांमुळेंच होत असते, म्हणून ह्या प्रकारच्या स्वप्नांस भावनिक स्वप्नें ( Emotional Dreams ) असें म्हणतां येईल.

( इ ) जागेंपणींच्या जीवनांतील एखादी मूळ जबरदस्त इच्छा, आकांक्षा, वासना, प्रवृत्ति, वगैरे अतृप्त राहिल्यास तिचाहि खोल संस्कार मनावर राहून त्याचा पुनःप्रत्यय, विशेषतः परिपूर्ति झालेल्या स्वरूपांत जागेंपणींच्या जीवनांत दिवा-स्वप्नाच्या ( Day-dream ) रूपानें किंवा झोपेंतील रात्रि-स्वप्नाच्या रूपानें येऊं शकेल. उदाहरणार्थ, वांझ बाईस आपणांस डोहाळे लागल्याचें स्वप्न पडतें, किंवा नापास होणाऱ्या विद्यार्थ्यास आपण पास झाल्याची तार आल्याचें स्वप्न पडतें. अशा पूर्तीच्या स्वप्नाच्या बुडाशीं बहुशः नेहमीं अतृप्त लिंगवासना प्रत्यक्षाप्रत्यक्ष असते, असें विख्यात मनोविश्लेषणशास्त्रज्ञ फ्रॉईडचें मत होतें. या प्रकारच्या स्वप्नांस वासनापूर्ति-स्वप्नें ( Wish-fulfilment Dreams ) असें म्हणतां येईल.

(ई) याशिवाय जागेंपणींच्या जीवनांत जे अनेकविध व्यावहारिक अडचणींचे प्रश्न मनापुढें उपस्थित होत असतात, त्यांचेंहि चित्रण स्वप्नांत होऊं शकतें. उदा-हरणार्थ, एक सापत्य निराश्रित बाई एकटीच आपल्या नातलगाकडे आश्रयास रहात असतांना व तिचीं मुलें इतरत्र अडचणींत दिवस कंठीत असतांना तिची इच्छा साहजिकच आपल्या मुलांसहि तेथेंच आपणांजवळ राहण्यास आणावें अशी होती. पण या तिच्या इच्छेस तिच्या त्या आश्रयदात्या नातलगांची त्यांच्या कांहीं अड-चणींमुळें संमति नव्हती. अशी मनाची कोंडमाऱ्याची अवस्था असतांना तिला स्वप्न पडलें कीं तिचीं मुलें एका घराच्या उंच माळ्यावर अडकून पडलीं आहेत, व त्यांना त्यांतून बाहेर येतां येत नाहीं, व तीहि त्यांना








त्या कामीं मदत करूं शकत नाहीं. या स्वप्नांत तिच्या जागेंपणींच्या जीवनांतील अडचणींचें चिन्ह-चित्रण (symbolization) झालेलें आहे हें उघड आहे. या प्रकारच्या स्वप्नांस प्रश्न-स्वप्नें किंवा समस्या-स्वप्नें (Problem Dreams) असें म्हणतां येईल.

## जागेंपणींच्या अनुभवांचें स्वप्नांतील विकरण

यांप्रमाणें जागेंपणींच्या जीवनांतील मानसिक अनुभवांशीं स्वप्नांचा संबंध असतो असें म्हणतां येईल; व हेंच आपल्या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर होय. परंतु या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती ही कीं जागेंपणींचे अनुभव जसेच्या तसे स्वप्नांत चित्रित होत नाहींत, तर त्यांत बहुशः खूपच फेरफार किंवा विकार होत असतात. जागेंपणींचे अनुभव विकृत रूपानें किंवा प्रतीकरूपानें (symbol) स्वप्नांत चित्रित होतात, व त्यामुळें जागेंपणींच्या अनुभवांचा हा स्वप्नांशीं असणारा संबंध छपविला जाऊन तो स्वाप्निकाच्या (Dreamer) लक्षांत येत नाहीं, व त्यामुळें स्वाप्निकास मूळ जागेंपणींच्या संस्कारानें जसा धक्का बसतो तसा स्वप्नांत झोंप मोडण्याइतका धक्का बसत नाहीं. अर्थात् कांहीं वेळां असा धक्का स्वप्नांतहि बसतो, व त्यामुळें स्वप्न नाहींसें होऊन झोंपहि मोडते व मनुष्य जागा होतो. मूळ अनुभवांचें स्वप्न-चित्रण होतांना त्यांचें जें विकरण होतें, त्याचेहि नियम अलीकडील मानसशास्त्रानें बसविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु त्या खोल पाण्यांत शिरण्यास आपणांस येथें अवकाश नाहीं. त्यांत पूर्वींच उल्लेखिलेली मुख्य मुद्द्याची गोष्ट एवढीच कीं स्वप्नावस्थेंत जागेंपणींच्या अनुभवांतील घटकांची ठरलेली जुळणी किंवा विवेकसंकेत किंवा साहचर्याचे नियम कार्यकर नसतात. इतकेंच नव्हे, तर स्वप्नावस्थेंतील मनाचे व्यापार अगदीं अव्यवस्थित व असंस्कृत किंवा रानटी पातळीवर होत असतात. ह्यामुळें जागेंपणींच्या अनुभवांची व त्यांतील घटकांची स्वप्न-चित्रणांत बेसुमार सरमिसळ होते. त्यामुळें स्वप्नानुभव हे जागृतानुभवांची हुबेहूब प्रतिकृति, किंबहुना थोड्या फेरफाराची प्रतिकृतीहि असत नाहींत, तर ते नेहमींच त्या अनुभवांचीं वरींच विकृत चित्रणें असतात. विशेषतः जागृतावस्थेंतील जे अनुभव दुःखदायक किंवा अप्रिय असतात, त्यांचें स्वप्नावस्थेंत बरेंच विकरण होतें. मूळ अनुभवांतील व्यक्ति वा विषय ह्यांच्या जागीं दुसऱ्याच पण अर्थपूर्ण चिन्हवस्तु किंवा प्रतीक-वस्तु (symbols) स्वप्नांत दिसतात, व मूळ अनुभवांतील इच्छा, वासना, आकांक्षा, भाव, भावना ह्याहि मूळ वस्तूंहून किंवा विषयांहून वेगळ्याच परंतु अर्थपूर्ण चिन्हवस्तूंस चिकटविल्या जातात. ह्यामुळें स्वप्नविवरण (interpretation of dreams) म्हणजे स्वप्नांचा अर्थ लावणें ही एक मोठी व विशेष जबाबदारीची जोखीम आहे. ती विशेष अभ्यासी स्वप्नशास्त्रज्ञांवांचून कोणी पत्करूं नये. तसें केल्यास त्यांत धोका आहे. कारण स्वप्नांचा भलताच इष्टानिष्ट अर्थ लाविला गेल्यास त्या योगानें जागृत जीवनावरहि दुष्परिणाम घडण्याचा संभव असतो. प्रकट स्वप्न (manifest dream) व स्वप्नाचा अप्रकट किंवा गुप्त आशय (latent dream content) हीं वेगळीं असतात; व प्रकट स्वप्नामधून त्याचा गुप्त आशय काढून दाखविणें ही विशेषाभ्यासानेंच साध्य होणारी गोष्ट आहे.

## प्रकृतीचा स्वप्नांशीं संबंध

विरळ झोंपेंत जागृतावस्थेंतील पूर्वसंस्कारांच्या होणाऱ्या जागृतीमुळें स्वप्नें पडतात असें वर म्हटलें. परंतु झोंपेंतील ही स्वप्नोत्पादक पूर्वसंस्कारांची जागृति सुद्धां आपोआप म्हणजे इंद्रियसंस्कारांशिवाय घडून येईल, किंवा इंद्रियसंस्कारांमुळें घडून येईल. सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास ज्या विरळ झोंपेंत तिच्या विरळतेमुळेंच पूर्वसंस्कारजागृतीस अवसर मिळतो, त्या विरळतेचें तरी कारण शेवटीं शारीरिक आरोग्याची असमाधानकारक स्थिति हेंच असल्यामुळें, शेवटीं स्वप्नांत आपोआप घडून येणारी म्हणून म्हटलेली पूर्वसंस्कारजागृति ही सुद्धां झोंपेंतील शारीरिक म्हणजेच ऐन्द्रिय संस्कारांमुळेंच घडून येते, असें म्हटलें पाहिजे. आपलीं इंद्रियें हीं, डोळे, कान, इत्यादिकांप्रमाणें, शरीराच्या बाह्य पृष्ठभागावरच केवळ असतात असें नाहीं, तर तीं शरीरांतर्गत भागांतहि सृष्टीनें ठेवलेलीं असतात. ह्या शरीरांतर्गत इंद्रियांमुळेंच पोट भरल्याची किंवा पोटांत दुखल्याची किंवा छाती जड वाटल्याची, किंवा कोठा साफ असल्याची किंवा नसल्याची जाणीव आपणांस होत असते. आरोग्यांत कांहीं बिघाड झाला










असल्यास किंवा आरोग्याची स्वस्थता असल्यास त्याचीहि जाणीव देणारे अंतरिन्द्रियांचे संस्कार आपल्या मनावर जागृतावस्थेंतहि सतत घडत असतात. स्वस्था-रोग्याची जाणीव देणारे संस्कार झोंपेस अपकारक असत नाहींत. परंतु अनारोग्याची जाणीव देणारे संस्कार झोंपेस अपकारक असतात; व ते झोंपेची गाढता कमी करतात, तिची विरळता वाढवितात. म्हणून शरीर-प्रकृतीचा, म्हणजे विशेषतः अनारोग्याचा, स्वप्नाशीं असा साक्षात् संबंध असतो असें म्हणावयास हरकत नाहीं ; व हेंच आपल्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर होय. शरीरांतर्गत अनारोग्यामुळें त्याबाबतचे जे संस्कार झोंपेंतहि मनावर होतात, त्यामुळें झोंप विरळ होते, व त्यामुळें पूर्वसंस्कारांच्या जागृतीस अवसर मिळून स्वप्नें उत्पन्न होतात. अर्थात् ह्या संस्कारांच्या जागृतींत म्हणजे त्यांच्या स्वप्नांतर्गत पुनर्निर्मितींत ते बरेचसे विकृत होतात, हें वर आलेंच आहे.

### बाह्य संस्कारांचा स्वप्नांशीं संबंध

परंतु ह्याशिवाय, म्हणजे शारीरिक अनारोग्यामुळें होणाऱ्या अन्तर्गत इन्द्रियसंस्कारांव्यतिरिक्त, बाह्य इंद्रियसंस्कारांच्या द्वारांसुद्धां पूर्ण आंतरिक आरोग्या-वस्थेंतहि झोंपेंत इंद्रियांवर व त्याद्वारां मनावर जे संस्कार घडतात वा प्रायोगिक रीत्या घडवून आणतां येतात, त्यांच्याहि योगानें स्वप्नचित्रण होऊं लागतें. आपल्या झोंपेंत सुद्धां भोंवतालच्या परिस्थितीमधून आपल्या इंद्रियांवर संस्कार घडत असतात. उदाहरणार्थ, थंडीच्या दिवसांत शरीराचा एखादा भाग, पाय किंवा हात, पांघरुणाच्या बाहेर पडल्यास बर्फावरून चालल्याचें किंवा बर्फास स्पर्श केल्याचें स्वप्न पडेल. ह्यावरून स्वप्न हें झोंपेंतील इंद्रिय-संस्काराबद्दलच्या चुकीच्या समजुतीच्या ( अपविवरणा-च्या ) स्वरूपाचें असतें असें म्हणतां येईल. जागृतावस्थेंत घडणाऱ्या इंद्रिय-संस्कारावरून संस्कारक वस्तूच्या स्व-रूपासंबंधीं आपण बिनचूक किंवा बरोबर समजूत (सद्वि-वरण) करून घेत असतों. उदाहरणार्थ, हांकेवरून हांक मारणाऱ्या व्यक्तीचें ज्ञान आपणांस होतें. झोंपेंतील इंद्रिय-संस्कारावरून मात्र स्वप्नांत भलतेंच म्हणजेच चुकीचें ज्ञान किंवा समजूत ( अपविवरण ) आपण करून घेत असतों. ह्या भलत्याच होणाऱ्या विवरणांत त्या वेळीं मनांत सुप्त असलेले जागृतावस्थेंतील अनुभवांचे शेष-संस्कार व निद्रावस्थेंतील मनोव्यापारांची असंस्कृति व अव्यवस्था ह्यांचा बराच भाग असतो. ह्यामुळें निद्रें-तील इंद्रियसंस्कारास कुठला तरी भलताच अर्थ स्वप्न-रूपांत प्राप्त होईल हें उघड आहे. झोंपेंतील घड्याळा-च्या गजराच्या संस्कारास वेगवेगळया स्वाप्निकांच्या स्वप्नांत त्यांच्या त्यांच्या मानसिक पूर्वेतिहासाच्या संदर्भाप्रमाणें वेगवेगळा अर्थ प्राप्त होईल. उदाहरणार्थ, आगीच्या बंबाचा आवाज, चर्चची घंटा, टेबलावरून खालीं पडणाऱ्या चिनी सामानाची फूटतूट, वगैरे. अशा तऱ्हेनें निद्रावस्थेंत होणाऱ्या इंद्रियसंस्कारावरूनहि स्वप्न सुरू होऊन तें पूर्वानुभवांच्या शेषसंस्कारांच्या रंगांत स्वप्नीय मनोव्यापारांच्या असंस्कृत अव्यवस्थे-मुळें अस्ताव्यस्त रंगतें हें उघड आहे.

### त्याची प्रायोगिक सिद्धि

स्वप्नीय मनोव्यापारांसंबधीचें तत्त्व हेंच प्रयोग-रीतीनेंहि सिद्ध झालें आहे. झोंपेंतल्या व्यक्तीस वेग-वेगळे इन्द्रियसंस्कार मुद्दाम पुरविल्यास त्या त्या व्यक्तींच्या मानसिक इतिहासाप्रमाणें त्या त्या संस्कारां-चा वेगवेगळा अर्थ स्वप्नरूपानें लावला जातो असें अलीकडील मानसशास्त्रांत प्रस्थापित झालें आहे. उदाहरणार्थ, हाताच्या तळव्याच्या पाठीवर कापूस-बोळयाचा स्पर्श केल्यानें एका स्वाप्निकास गाईनें त्याचा हात चाटल्याचें स्वप्न पडलें, तर दुसऱ्यास कैसाळ कुत्र्यानें त्यास अंग घासलें असें स्वप्न पडलें. तसेंच, हाताच्या पाठीस चिमटा घेतल्यामुळें एकास बिळांतून बाहेर आलेला उंदीर चावल्याचें स्वप्न पडलें, तर दुसऱ्यासहि तो आपल्या प्रयोगशाळेंतील उंदीर हाता-ळीत असतांना त्यांतील एक त्यास चावल्याचें स्वप्न पडलें. ह्यावरून झोंपेच्या अवस्थेंतहि इन्द्रियसंस्कार झाल्यास वा घडविल्यास स्वप्नीय मनोव्यापारांत त्याचें अपविवरण होऊन ते स्वप्नानुभवांत गोंवले जातात हें उघड होय. हें विवेचनहि आपल्या तिसऱ्या प्रश्नाचें-च व्यापक अर्थानें दिलेलें उत्तर म्हणतां येईल.

### स्वप्नें भविष्यसूचक असतात काय ?

आतां शेवटचा विचार करावयाचा प्रश्न म्हणजे स्वप्नें भविष्यसूचक असतात काय हा होय. भविष्या-बद्दल स्वप्नें पडतात ही गोष्ट खरी आहे. उदाहरणार्थ, परीक्षेचा अभ्यास करणारा विद्यार्थी परीक्षेंतील आपल्या भविष्याबद्दल काळजी करीत असतांना त्यांस परीक्षेंत आपण पास किंवा नापास झाल्याचें स्वप्न विविध प्रकारांनीं पडूं शकेल. परंतु या स्वप्नास भविष्यसूचक



अनुक्रमणिका






म्हणावयाचें किंवा नाहीं हाच काय तो वादाचा प्रश्न आहे. किंबहुना, भविष्यसूचन म्हणजे काय याचा अर्थ निश्चित केल्याशिवाय स्वप्नें भविष्यसूचक असतात कीं नाहीं याचें निश्चित उत्तर देतां येणार नाहीं. शास्त्रीय दृष्ट्या पहातां भविष्यकथन किंवा भविष्यसूचन म्हणजे वर्तमानांत उपलब्ध असलेल्या संबद्ध पुराव्यावरून भविष्यांत अमुक अमुक घडणें संभवनीय किंवा अटळ आहे असें वर्तवितां येणें याचें नांव भविष्यसूचन किंवा भविष्यकथन. या दृष्टीनें पहातां स्वाप्निकांस पडणाऱ्या स्वप्नांवरून भविष्यकथन करतां येतें काय हा खरा प्रश्न आहे. या प्रश्नास 'होय' असें उत्तर शास्त्रीय दृष्ट्या देतां येत नाहीं. भविष्याबद्दल स्वप्नें पडतील, व कांहीं वेळां तीं खरींहि ठरूं शकतील. परंतु त्यामुळें स्वप्न हा एक भविष्यज्ञानाचा जागृत ज्ञानापेक्षां अधिक परिणामकारक किंवा अचूक मार्ग आहे असें म्हणतां येणार नाहीं. स्वाप्निकांस कांहीं अतींद्रिय किंवा गूढ दृष्टि प्राप्त होते, कीं जी जागृतांस सामान्यपणें असत नाहीं किंवा प्राप्त करून घेतां येत नाहीं, असें म्हणणें शास्त्रीय दृष्टीस पटत नाहीं. स्वप्नांच्या द्वारां कांहीं दैवी शक्ति भविष्यसूचन करीत असते हेंहि म्हणणें शास्त्राच्या कक्षेंत बसत नाहीं. तेव्हां भविष्याबद्दल पडणारीं स्वप्नें भविष्यसूचक असतात किंवा भविष्यसूचनाच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व सिद्ध झालें असें म्हणतां येत नाहीं. स्वप्नांच्या भविष्यसूचकत्वावरील विश्वास ही एक भोळी समजूत आहे व तिच्यामागें भीति, इच्छा, आकांक्षा, इत्यादि मनाच्या प्रवृत्ति आहेत. त्यांस शांत शास्त्रीय विचाराचा पाठिंबा आहे असें दिसत नाहीं. स्वप्नें हीं भविष्यसूचक असतात कीं काय यासंबंधींचें शास्त्रीय परीक्षण करण्याचा एका अमेरिकन मानसशास्त्रज्ञानें केलेला मनोरंजक उद्योग येथें उल्लेख करण्यासारखा आहे. कित्येक वर्षांपूर्वी विख्यात अमेरिकन वैमानिक लिंडबर्ग याच्या बालकास पळवून नेण्यांत आलें होतें हें कांहीं वाचकांस तरी माहित असेल. या बालकाच्या चोरीनंतर लोकांत साहजिकच मोठी खळबळ उडाली, व पुष्कळांस त्या बालकाच्या ठावठिकाण्याबद्दल व स्थितीबद्दल स्वप्नें पडूं लागलीं. अशा लोकांपैकीं सुमारें तेराशें लोकांच्या स्वप्नांचीं निवेदनें मानसशास्त्रज्ञ मरे यानें जमविलीं व त्यांचा अभ्यास केला. या स्वप्नांपकीं शेंकडा फक्त पांच स्वप्नांत लिंडबर्ग-बालकास मृत्यु आला असें होतें. इतरांत तें बालक जिवंत असून त्याची विविध ठावठिकाणें दिलीं होतीं. वस्तुस्थिति अशी होती कीं त्या बालकास ठार मारण्यांत आलें होतें. यावरून स्वप्नांवरून भविष्यसूचन होतें या म्हणण्यास अनुभवाचा आधार दिसत नाहीं.

## स्वप्नावरून स्वाप्निकाबद्दल भविष्यसूचन शक्य

मात्र स्वप्नावरून स्वतः स्वाप्निकाबद्दल मात्र भविष्यसूचन होणें शक्य आहे हें मान्य केलें पाहिजे. कारण, स्वप्नांत पुष्कळ वेळां स्वाप्निक व्यक्तीस त्या वेळीं विशेष चिंताग्रस्त किंवा अस्वस्थ करणाऱ्या प्रश्नांचें चिन्हरूप चित्रण असतें व त्यावरून स्वाप्निकाच्या मनाची तत्कालीन परिस्थिति व प्रवृत्ति समजून येणें शक्य आहे, व या ज्ञानावरून स्वाप्निक व्यक्ति निकटच्या भविष्यकाळांत काय करण्याचा किंवा कसें वागण्याचा संभव आहे हें समजणें शक्य आहे. परंतु अर्थातच अशा तऱ्हेचें भविष्यकथन करण्यास स्वतः स्वाप्निकापेक्षां स्वप्नशास्त्रज्ञ हाच अधिक समर्थ असणार. कारण स्वप्नांचा अर्थ लावण्याचें काम त्यासंबंधीं विशेष अभ्यास केलेल्या मानसशास्त्रज्ञांसच करणें शक्य होईल. असा अभ्यास न केलेल्यांनीं, विशेषतः अनभ्यस्त स्वाप्निकांनीं, स्वप्नांचा आपापल्या भोळ्या समजुतीप्रमाणें किंवा मन मानेल तसा अर्थ लावून तदनुरूप आपल्या जीवनक्रमांत फिरवाफिरव करीत बसणें हें अत्यंत धोक्याचें होय. खुद्द स्वप्नशास्त्रज्ञानेंसुद्धां लावलेले स्वप्नांचे अर्थ व त्यावरून केलेलीं भविष्यसूचनें यांचा उपयोग फार काळजीपूर्वक करण्यांत आला पाहिजे. महत्त्वाचे निर्णय त्यावर अवलंबून ठेवतां कामा नयेत. कारण स्वप्नशास्त्र हें अजून काटेकोर किंवा बिनचूक स्वरूपाचें शास्त्र झालें आहे असें म्हणतां येत नाहीं. तें शास्त्र अजून कच्च्या व आनुभविक ( empirical ) स्वरूपाचें आहे. त्यानें केलेलीं स्वप्नार्थविवरणें किंवा स्वाप्निकाबद्दलचीं भविष्यसूचनें हीं सामान्यतः व्यावहारिक जीवनांत मनुष्यस्वभावाच्या ज्ञानावरून केलेल्या अंदाजासारखीं म्हणजे ढोबळ स्वरूपाचीं होत. हे अंदाज नेहमींच खरे ठरतील असें नाहीं. यावरून स्वप्नें हीं कांहीं विशेष अर्थानें भविष्यसूचक असतात या लौकिक समजुतीस फारसा आधार आहे असें म्हणतां येत नाहीं हें उघड होईल. हें आपल्या चौथ्या प्रश्नाचें उत्तर होय.








डॉ. ना. र. इनामदार

# इन्डो-चायना लोक, प्रदेश व संस्कृति

इन्डोचायना हें देशाचें नांव समर्पक आहे. इन्डोचायनाच्या प्राचीन इतिहासाशीं चीनप्रमाणें भारताचें नांव निगडित झालें आहे. इसवी सनापूर्वी २०० वर्षांच्या सुमारास भारतीय संस्कृतीचा प्रभाव व प्रचार इन्डोचायनांत झाला, सम्राट् अशोकानें बुद्ध-धर्माचा प्रसार केला. इन्डोचायनांतहि हिन्दु धर्माची जागा बौद्ध धर्मानें घेतली. आज इन्डोचायनांतील बहुसंख्य लोक बौद्धधर्माचे अनुयायी आहेत. त्यांच्या रहाणींत वा विचारसरणींत हिन्दु धर्माचा अवशेष दिसत नाहीं, पण तेथील प्राचीन इतिहासाची साक्ष देणारीं जीं पुरातन मन्दिरें, राजवाडे व भव्य वास्तु सांपडल्या आहेत त्यांवर हिन्दुधर्माची स्वच्छ व ठसठशीत छाप दिसून येते.

चीनचे इन्डोचायनाशीं असलेले संबंध फार घनिष्ठ स्वरूपाचे आहेत. एक तर, इन्डोचायनांतील लोक जरी निरनिराळया प्रकारचे असले तरी, चिनी लोकाप्रमाणेंच ते मंगोलियन वंशाचे आहेत. बुटका बान्धा, पीतवर्ण, बसका तोण्डावळा व लांबसडक केस हीं या वंशाच्या लोकांचीं वैशिष्ट्यें होत. चीनमध्यें प्रचलित असलेले धर्मच कमीअधिक प्रमाणांत इन्डोचायनांतहि अस्तित्वांत आहेत. बौद्धधर्म, कन्फुशियसचा धर्म, ताओधर्म, कॅथॉलिक-खिश्चन धर्म हे ते धर्म होत. पण चीन व इन्डोचायना यांमधील घनिष्ठ संबंधाचें सर्वांत प्रबळ कारण इन्डोचायनाच्या इतिहासांत सांपडतें. इन्डोचायनामध्यें वसति करण्यासाठीं दक्षिण चीनमधून अतिप्राचीन काळापासून टोळया आल्या. आजतागायत डोंगराळ विभागांत असलेल्या मेओस, मान वगैरे ज्या वन्य जमाती आढळतात त्याहि आग्नेय चीनमधून इन्डोचायनामध्यें उतरल्या. इन्डोचायनांत बहुसंख्य असलेले अनामी लोक इसवी सनापूर्वी दोन हजार वर्षांच्या सुमारास चीनमधून अगोदरच्या टोळयांप्रमाणच आले. यासंबंधीं एक मनोरंजक लोककथा प्रचलित आहे. चीनमधील हॅंगबॅंग वंशामधील एका राजपुत्रानें एका परीशीं लग्न केलें. या लग्नसंबंधापासून परीला मुलें होण्याऐवजीं त्या परीनें अण्डीं घातलीं, आणि या अण्ड्यांपासून मुलें उद्भवलीं. परीच्या या विलक्षण वागण्यामुळें रागावूनच कीं काय राजपुत्र कांहीं मुलें घेऊन दक्षिणेकडे निघाला. त्याआधीं परीनें मुलांचा एक गट घेऊन उत्तरेकडे गमन केलें होतें. इन्डोचायनाच्या टोकिन प्रांतांत, लाल नदीच्या दुआब प्रदेशांत राजपुत्रानें मुलांसमवेत ठाण मांडलें. हेंच इतिहासांतील पहिलें व्हिएटनामी राज्य. पुढें तें इ. स.पूर्वी १११ सालीं चीननें जिंकलें. या प्रदेशाला चिनी लोकांनीं 'अनाम' म्हणजे 'शान्त दक्षिणदेश' असें नांव दिलें. तेव्हांपासून इ. स. १८८६ पर्यंत या ना त्या स्वरूपांत चीनचें अधिराज्य इन्डोचायनावर होतें. इ. स. ४० मध्यें ट्रुंग नांवाच्या दोन बहिणींनीं चिनी साम्राज्यसत्तेविरुद्ध बंड केलें, दोन वर्षें स्वातंत्र्य टिकवलें, पण प्रबळ चिनी सत्तपुढें तें टिकलें नाहीं. फ्रान्समधील स्वातंत्र्यासाठीं लढणारी विराणी जोन ऑफ ऑक हिला फ्रेंच सन्तांच्या मालिकेंत गोंवतात, तर ट्रुंगभगिनींना व्हिएटनामी लोक देवता म्हणून पूजितात ! इ. स. ९३९ पासून १८८६ पर्यंत सात बंडें झालीं. चीनचें प्रत्यक्ष साम्राज्य व्हिएटनामनें झुगारुन दिलें पण नवीन राजाचा राज्यारोहणसमारंभ चीनमध्यें होत असे आणि प्रवासांत आलेल्या अडथळयांमुळें राज्यारोहण लांबणीवर पडल्याचे दाखले व्हिएटनामच्या इतिहासांत उपलब्ध आहेत. अशा रीतीनें रक्ताच्या नात्यामुळें व दीर्घ ऐतिहासिक संबंधामुळें चिनी संस्कृतीची इन्डोचायनांतील लोकांवर पडलेली दाट छाया नजरेंत भरते.

चीनचें अधिराज्य १८८६ सालीं संपुष्टांत आलें. त्याऐवजीं फ्रान्सच्या दावणींत इन्डोचायना बांधला गेला. किंबहुना, चीनचें अधिराज्य फ्रान्सनें काबीज केलें असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. व्यापाऱ्यांच्या पाठोपाठ मिशनरी व मिशनऱ्यांची छळणूक थांबविण्यासाठीं लढाया हा साम्राज्यविस्ताराचा क्रम, इतर पाश्चात्त्य देशांप्रमाणेंच फ्रान्सनें अनुसरला. हिंदुस्थानांतल्या मानानें इन्डोचायनांत खिस्ती मिशनऱ्यांनीं आपलें जाळें विस्तृत विणलें होतें, आणि म्हणून त्यांच्या कार्यास स्थानिक राजांनीं सशस्त्र प्रतिकार केला. ऱ्होड्स (इ. स. १६२४), लॅम्बर्ट १६८२), बिहाइन १७८७) या मिशनऱ्यांनीं धर्मप्रसाराच्या कामीं शर्थ केली. फ्रान्समधील








व्यापाऱ्यांनीं मिशनऱ्यांना सक्रिय मदत केली, कारण धर्मप्रसाराच्या मिषाखालीं त्यांना व्यापार वाढवावयाचा होता. अनामच्या सम्राटाला फ्रेंचांशीं व्यापार हवा होता. पण धर्मप्रसारास त्याचा कट्टर विरोध होता. त्यानें मिशनऱ्यांना तुरुंगाची वाट दाखविली. आणि येथूनच अनामी व फ्रेंच यांमध्यें युद्ध जुंपलें ( इ. स. १८४८ ), कोचीनचायन, ( १८६२ ), काम्बोडिया ( १८६३ ), अनाम ( १८७३ ) हे आणि राहिलेले भाग क्रमाक्रमानें फ्रेंचांच्या ताब्यांत आले. अनाम, कांम्बोडिया व लाओस हे जे इन्डोचायनाचे राजकीय विभाग दिसतात ते इ. स. १८७४ च्या तहानें अस्तित्वांत आले. तिन्ही ठिकाणीं राजांची नामधारी सत्ता राहिली, पण वस्तुतः ते फ्रेंचांच्या साम्राज्याचे पाईक बनले. ( १८९७. ).

फ्रेंच साम्राज्यशाहीचे इन्डोचायनावर अनिष्ट तसेच इष्टहि परिणाम झाले. भौतिक सुधारणा व कार्यक्षम आणि आधुनिक राज्यकारभार ही जशी नाण्याची एक बाजू, तशी आर्थिक पिळणूक ही विरुद्ध बाजू. धान्य, इतर पिकें व विविध उद्योगधंद्यांना लागणारी खनिज व विजेसारखी सामग्री या सर्व दृष्टींनीं इन्डोचायना हा आग्नेय आशियांत सुसंपन्न असा देश आहे. मुलांच्या खेळांत असणाऱ्या डम्बेलसारखा या देशाचा आकार आहे. ६० लाख टन इतकें तांदुळाचें वार्षिक पीक आहे. त्यापैकीं २० लाख टन निर्यात होतो. लोकांना खाऊन उरेल इतकीं धान्यें इन्डोचायनांत पिकतात. इतकेंच नव्हे तर सर्व प्रकारच्या उद्योगधंद्यांना आवश्यक असणारी खनिज सामग्री व इतर कच्चा माल देशांत उपलब्ध आहे. निसर्गानें सहस्र हातांनीं देणगी दिली आहे. समृद्ध जीवन निर्माण करूं शकेल अशी आधुनिक अर्थव्यवस्था इन्डोचायनांत स्थापन झाली नाहीं याला मानवी. इच्छा व प्रयत्नाचा अभाव याखेरीज दुसरें कारण दिसत नाहीं. फ्रेंच साम्राज्यशाहीनें आतांपर्यंत इन्डोचायनांतील स्वदेशी उद्योगधंद्यांस उत्तेजन दिलें नाहीं. त्यामुळें खनिज पदार्थ परदेशीं निर्यात करण्यावांचून दुसरें प्राप्तीचें साधन उपलब्ध झालें नाहीं. यांत्रिक शक्तीवर ( वा विजेवर ) चालणाऱ्या आधुनिक उद्योगधंद्यांच्या अभावामुळेंच लोकसंख्येचें शेतीवर दडपण वाढलें. शेतीवरच गुजराण करायची म्हटलें तर तांदुळाखेरीज तितक्याच महत्त्वाचें दुसरें पीक निघत नाहीं. एकूण ३ लाख क्षेत्रफळापैकीं फक्त एक अष्टमांश जमीन लागवडीखालीं आहे, कारण डोंगराळ मुलुख व जंगलें यानीं बहुतेक भाग व्यापला आहे. निम्म्याच्यावर क्षेत्र जंगलानीं व्यापलें आहे. इ. स. १८८० मध्यें १ कोटी लोकसंख्या होती ती आतां २ कोटी ८० लाखापर्यंत वाढली आहे. तरी इन्डोचायनांतील जननप्रमाण आग्नेय आशियांतील सर्व देशांत कमी आहे. इन्डोनेशियाच्या मानानें ( तेथें दर चौरस मैलास १९०० ) इन्डोचायनामध्यें लोकसंख्येची घनता कमी ( दर चौरस मैलास ७५६ ) आहे. उद्योगधंद्यांची वाढ, खतें वगैरे सामग्रीचा उपयोग करून शेतीची सुधारणा हे उपाय तर स्वतंत्र इन्डोचायनास योजावे लागतीलच. पण शिवाय भरमसाट वाढणाऱ्या लोकसंख्येसहि आळा घालावा लागेल. युद्धामुळें १९३९ सालानंतर बहुतेक महत्त्वाच्या ( तांदुळ व रबर ) या पिकांचें, ( कोळसा, सिमेंट, इ० ) खनिजांचें व इतर वस्तूंचें उत्पादन फारच घटलें, आतां शांतता प्रस्थापित झाल्यानें तें वाढेल असें धरावयास हरकत नाहीं.

इन्डोचायनाचें हवामान दक्षिण भारतासारखें आहे. नऋत्य मान्सून वाऱ्यामुळें उन्हाळ्याच्या शेवटीं भरपूर पाऊस पडतो, आणि भाताची पेरणी त्याचवेळीं होते. हिवाळ्यांत वहाणारे इशान्य मान्सुन वारे मात्र कोरडे असतात. त्यामुळें उत्तरेकडे हिवाळ्यांतहि थोडा पाऊस पडतो. म्हणून उत्तरेकडे लाल नदीच्या खोऱ्यांत भाताचीं दोन पिकें निघतात. दक्षिणेकडे फक्त उन्हाळी भाताचें पीक निघतें. दक्षिणेकडे मेकाँग नदीच्या खोऱ्यांत ७७ इंच पाऊस पडतो, तर उत्तरेकडे ६० इंच पडतो. उत्तरेकडचें हवामान हिवाळ्यांत किंचित थंड होतें, दक्षिणेकड मात्र बारा महिने उष्मा भासतो. दक्षिणेकडे किमान व कमाल उष्णतामानाची मर्यादा ७९°–८६° ( फॅरनहाइट ) असते, तर उत्तरेकडे ६०°–८५° ( फॅ. ) असते. यावरून दक्षिणेकडच्या ऊष्म्याची कल्पना येईल.

इंडोचायनाचे भौगोलिक दृष्ट्या तीन ठळक भाग पडतात. पहिला उत्तरेकडचा लाल नदीच्या खोऱ्याचा व दक्षिणेकडचा मेकाँग नदीच्या खोऱ्याचा. या विभागांत भरपूर पाऊस, उष्ण हवामान व सुपीक जमीन — यांमुळें तांदुळ तर विपुल होतोच पण त्याशिवाय मका,










सोयाबीन, ऊंस, केळीं, रताळीं हीं खाद्य पिकें, तंबाखु, मसाल्याचे पदार्थ, चहा, कॉफी, रबर, कापूस, व गळितें हीं इतर पिकें होतात. या नैसर्गिक विभागांत उत्तरेकडचा टोंकिन प्रान्त, दक्षिणेकडचा **कोचीन-चायना** व पश्चिमेकडचें काम्बोडिया संस्थान यांचा समावेश होतो. **दुसरा विभाग डोंगराळ व जंगली मुलुखाचा.** काम्बोडियाच्या उत्तरेकडचें **लाओस** संस्थान व अनामची वायव्य–आग्नेय अशी उभी असलेली डोंगरांची रांग या विभागांत मोडते. अनाममधील या डोंगरांच्या सांखळींमुळें वस्तुतः देशाच्या दोन फळया झाल्या आहेत, आणि त्यामुळें त्यामधून वहातूक फारशी होत नाहीं. सबंध देशामध्यें एकसन्ध अर्थव्यवस्था निर्माण होण्यामध्यें हा मोठा भौगोलिक अडथळा आहे. जपान्यांनीं युद्धकाळांत आपल्या सोयीसाठीं दक्षिणोत्तर पूर्वकिनाऱ्याला समान्तर अशी रेल्वे बांधली होती. पण त्याखेरीज डोंगर फोडून वाट काढल्याचें ऐकिवांत नाहीं. **पूर्वेकडील अनामची किनारपट्टी हा तिसरा नैसर्गिक विभाग.** या पट्टींतून दळणवळण चालतें. तिथेंहि तांदुळ वगैरे पिकें निघतात. लाओस व अनाममधील जंगलांचा, लांकूड, औषधीपदार्थ वगैरे जिन्नस काढण्याकडे अद्याप फारसा उपयोग केला गेला नाहीं. लोकसंख्येच्या दडपणामुळें डोंगरांच्या उतरणीवर ( कोंकणांतल्याप्रमाणें ) झाडी जाळून तांदुळाची लावणी व्हावयास लागली आहे. पण एकदोन वर्षें अशा दग्ध डोंगरांचा उपयोग करून लोक दुसऱ्या डोंगराकडे वळतात. निरुपयोगी झालेल्या डोंगरावर चांगलें लाकूडहि परत उगवत नाहीं.

इजिप्तला ' नाइलची देणगी ' म्हणतात. **इन्डो-चायना म्हणजे ' लाल नदी ' व ' मेकाँग ' असें** भौगोलिक दृष्ट्या समीकरण मांडावयास हरकत नाहीं. या दोन्ही नद्यांच्या त्रिभुज प्रदेशांत तांदुळ विपुल पिकतो. पण या दोन्ही प्रदेशांत फरकहि आढळतो. लाल नदीच्या कांठच्या मातीपेक्षां मेकाँगच्या कांठच्या मातीचे थर नवीन आहेत व त्यामुळें तेथील जमीन जास्त सुपीक आहे. आग्नेय आशियांत इन्डोचायनांतून सर्वांत जास्त (२० लाख टन) तांदुळ निर्यात होतो. पण तांदुळाचें दर एकरीं उत्पादन आग्नेय आशियांत सर्वांत कमी आहे असें आंकडे सांगतात. इन्डोचायनांतून जो कांहीं तांदूळ निर्यात होतो तो मेकाँगच्या त्रिभुज प्रदेशांतील उत्पादनांतूनच होतो. लालनदीच्या आसमन्तात् लोकवसति दाट असल्यामुळें तिथें होणारा तांदूळ तिथेंच खपतो. लाल नदीच्या काठीं कांहीं ठिकाणीं दर चौरस मैलावर ६००० लोक रहातात. काम्बोडियांत त्या मानानें वसति विरल आहे, आणि लाओसमध्यें तर तुरळक आहे. अनामी लोक टोंकिन खोऱ्यांत फार दाटी व्हावयास लागली म्हणून गेल्या २०० वर्षांतच दक्षिणेकडे कोचीनचायना, काम्बोडियांकडे व पश्चिमेकडे लाओस संस्थानाकडे वळले. लाओस व काम्बोडियामधले लोक अनामी लोकांपेक्षां मागासलेले आहेत; लढाऊ वृत्ति व उद्योगप्रियता याबाबतींतहि ते अनामी लोकांपेक्षा बरेच मागें आहेत. त्यामुळें अनाम्यांचें लाओस व काम्बोडया येथील स्थानिक लोकावर आक्रमण झालें आहे. याची राजकीय क्षेत्रांत प्रतिक्रिया होणें संभाव्य आहे. लालनदीच्या खोऱ्यांत लाओस व काम्बोडियापेक्षां मलेरियाचा प्रादुर्भाव कमी प्रमाणांत होतो हेंहि या दाट लोकवस्तीचें एक भौगोलिक कारण सांगण्यांत येतें.

दाट वसतीमुळेंच लालनदीच्या खोऱ्यांत मेकाँग-खोऱ्यापेक्षा जास्त दारिद्य आढळतें. घरांच्या ठेवणींतून व बान्धणीमधून हें दारिद्य प्रत्ययास येतें. उत्तरेकडे घरें बांबूचीं, तर दक्षिणेकडे नारळाच्या झाडाचीं. आपल्याकडे केरळमध्यें नारळाच्या झाडाला 'कामधेनु' म्हणून संबोधतात. मेकाँगच्या खोऱ्यांत नारळाचा हरकामी उपयोग करतात. नारळाच्या झाडाच्या बुन्ध्याचा घराच्या सांगाड्यासाठीं उपयोग करतात. पानें चिखलांत थापून भिन्ती व छप्पर उभे करतात. नारळाच्या शेंडीचीं दोरखण्डें बनवतात. करवंटी जाळतात, खोबऱ्याचें काय करतात हें सांगावयास नकोच. उत्तरेकडे बाम्बूचा असाच विविध उपयोग करतात घरकामाशिवाय चटया, दुरड्या, बुरुडकाम, दोऱ्या, काड्या बांबूच्याच तयार करतात. आणि बांबूच्या निर्जीव पट्ट्यामधून माणसांचीं जिवन्त चित्रें उभीं करणें अनामी कारागीरच जाणे ! लाल नदीच्या खोऱ्यांतील शेती मेकाँगच्या कांठच्या शेतीपेक्षां अधिक मेहनतीनें, काळजीनें केली जाते आपल्याइकडच्या सारखेंच इन्डोचायनांतहि शेतीच्या कामीं अद्याप यन्त्रें वापरत नाहीत. नाहीं म्हणावयाला पम्पाचा पाणी खेंचण्याकडे उपयोग करतात.












टोंकिन प्रान्तांत लहान लहान शेतकऱ्यांच्या मालकीची जमीन असते, तर दक्षिणेकडे थोड्या जमीनदारांच्या हातांत जमीनीची मालकी एकवटलेली दिसते. काम्बोडिया व लाओसमध्यें रयतवारी पद्धत आढळते. कोचीनचायनामध्यें चारपंचमांश जमीनीची मशागत खण्डकरी जमीनदाराला खण्ड देऊन करतात. कोचीनचायनांतच नव्हे तर काम्बोडियांत सुद्धां कर्जबाजारीपणा फार आढळतो. मुद्दलावर दररोज दहा टक्के इतकें जबर व्याज सावकार आकारतात ! जुगाराच्या व्यसनामुळें खालच्या वर्गांत कर्जबाजारीपणा माजतो असें कांहीजण म्हणतात.

तांदुळ हें एकच धान्य इन्डोचायनांत पिकतें असें नाहीं. तांदुळाला बाहेर खप असतो, म्हणून त्याऐवजीं मका पिकवून तो लोकांनीं खावा म्हणून सरकारनें पुष्कळ खटाटोप केले. पण मक्याचें पीक ६॥ लाख टनाच्या पलीकडे गेलें नाहीं. ( इ. स. १९३९ ) मक्याखेरीज सोया बीन, रताळीं, केळीं, ऊंस ( ५००० टन सन १९५१-५२ ) हीं दुय्यम खाद्यपिकें निर्माण करतात.

तंबाखु, कापुस, मसाल्याचे पदार्थ, गळितें, कॉफी, ताग या पिकांना परदेशी बाजारपेठेंत फार मागणी असल्यामुळें परदेशी चलन उपलब्ध होतें. रबराची लागवड झाली आहे. पण इन्डोनेशियाच्या मानानें ती फारच तोकडी आहे. सबंध आग्नेय आशियांत १८ लाख टन ( सन १९५१ ) रबर निर्माण होतें. यांपैकीं फक्त ५९००० टन रबर इन्डोचायनांत होतें. देशांतून निर्यात होणाऱ्या पदार्थांत अर्थात् रबराला अग्रस्थान द्यावें लागेल. मच्छीमारीचा धन्दा अनामच्या किनाऱ्यावर जोरांत चालतो. शिवाय तो काम्बोडियामधील 'टूल सॅप' तळयामध्यें, जागोजागीं विखुरलेलीं तळीं, दलदली व नद्या यांमध्यें चालतो. अन्नामधील माशांचा आहार वगळला तर एकूण आहार निकृष्ट प्रतीचा असतो. जंगलांचा आर्थिक साधनसामग्री या दृष्टीनें अद्याप उपयोग केलेला नाहीं.

इन्डोचायनांतील उत्तरेच्या टोंकिन प्रांतांत खनिज पदार्थ विपुल प्रमाणांत सांपडतात. या बाबतींत इन्डोचायनाची तुलना कोरियाशीं करतां येईल. उद्योगधंद्यांच्या आघाडीवर टोंकिन प्रान्त व तो ज्याच्या ताब्यांत आहे ती राज्यसत्ता दक्षिणेकडच्या सत्तेच्या मानानें अग्रेसर रहाणार हें निर्विवाद होय. आतांपर्यन्त खनिजें कच्च्या स्वरूपांत निर्यात होत असत. कोळशाच्या २६ लाख टन वार्षिक उत्पादनापैकीं १८ लाख टन निर्यात होतो. नेहमींच्या अर्थानें कोळशाच्या खाणी इन्डोचायनांत नाहींत. टेकड्यांतून भगदाडें पाडून हा कोळसा काढतात. इन्डोचायनांतील कामगाराची उत्पादनक्षमता पाश्चात्त्य कामगारांच्या मानानें कमी आहे हें पुढील आंकड्यावरुन ध्यानांत येईल. पाश्चात्त्य कामगारानें हा कोळसा दररोज १०००० किलोग्रॅम इतका काढला असता, पण इन्डोचायनी कामगार फक्त ३०० किलोग्रॅम कोळसा काढतो. कोळश्याखेरीज लोखंड ( दरवर्षी ८०००० टन ) कथिल ( १६०० टन ), जस्त ( ५०००० टन ), शिसें, फॉस्फेट ( दरवर्षी १ लाख टन ), टंगस्टेन ( ४५० टन ), मॅंगेनीज ( १७०० टन ), सिमेंट ( २ लाख टन ), मीठ ( १, ९०००० टन ) क्रोमियम, ॲन्टिमनी, वुल्फ्रॅम हीं खनिजें उत्पन्न होतात. तुरळक प्रमाणांत सोनें, चांदी, बॉक्साइट व जवाहिरें सांपडतात. एकूण २ कोटी ८० लाख लोकसंख्येपैकीं १ लाख लोक उद्योगधंद्यांत गुंतलेले आहेत. यावरून औद्योगीकरण अद्याप किती अल्प झालें आहे याची कल्पना येईल. या १ लाख लोकांपैकीं ४०००० लोक खाणींत काम करतात. उरलेले ६०००० लोक सुती व रेशमी कापडाच्या गिरण्या, कागदाच्या गिरण्या, साखरेचे, काड्याच्या पेटीचे, रसायनांचे व वनस्पतिजन्य तेलांचे कारखाने, रेल्वेवर्कशॉप, पाणी, वीज इत्यादि लोकोपयोगी गोष्टींचा पुरवठा करणारे धन्दे यांत नोकरीस आहेत. कारखानदारी चालवण्यासाठीं लागणारें इन्धन कोळशाच्या प्रत्यक्ष रूपानें व वीज निर्माण करून पुरवतां येईल. सध्यां २,७० लक्ष किलोवॅट वीज दर वर्षी निर्माण होते. पण नद्या व पाणीसांठे यावर मुबलक वीज निर्माण होऊं शकेल. बुरुडकाम, सुतारकाम, वगैरे ग्रामोद्योगांत १० लाख लोक गुंतलेले आहेत.

औद्योगीकरणाच्या पोटीं जन्मणारीं शहरें इन्डोचायनांत फार थोडीं आहेत हें ओघानेंच येतें. आहेत तीं शहरें, बन्दर, व्यापाराच्या पेठा, राजधानीचीं ठिकाणें म्हणून नांवारूपास आलीं आहेत. सायगांव हें सर्वांत मोठें शहर आहे. त्याची लोकसंख्या १० लाख आहे. समुद्रामधून बोटी निघून सायगांव नदीमधून चाळीस मैल आंत थेट सायगांव शहराच्या हद्दीस भिडतात.








सायगांव शहरावर फ्रेंच संस्कृतीची दाट छाया पडलेली आहे. त्यामुळें त्याचा थाट फ्रान्समधल्या एखाद्या मोठ्या शहरासारखाच आहे. जवळच वसलेलें चोलन बन्दर चिनी व्यापाऱ्यांनीं गजबजलेलें आहे. इन्डोचायनाचा बराचसा व्यापार – तांदुळाचा तर सर्व व्यापार– चिनी लोकांच्या हातीं आहे. दहा लाख चिनी लोकांच्या ताब्यांत इन्डोचायनांतील मोक्याचे धन्दे आहेत. तांदुळाचें पीक यावें म्हणून चिनी व्यापारी शेतकऱ्यांना कर्ज पुरवतात. गुदामें यांच्या मालकीचीं असतात. वहातुकीचीं साधनें त्यांनीं ताब्यांत ठेवलीं आहेत. आणि तांदुळ भरडण्याच्या गिरण्याहि त्यांनीं चालवल्या आहेत. कोचीनचायनांत सायगांव व चोलन, तसें टोंकिनमध्यें हैफाँग ( ९७,००० लोकसंख्या ) बन्दर आहे. सायगांवमध्यें फ्रेंच संस्कृतीचें विलासी स्वरूप पहावयाला मिळतें, तर टोंकिनची राजधानी हनोओी ( १,४९००० लोकसंख्या ) हें फ्रेंचांच्या राज्यकारभारांतील आधुनिकतेचें व ज्ञानांतल्या प्रगतीचें पूर्वेतलें प्रतीक आहे असें म्हणतां येईल. अनामची राजधानी ह्यू, काम्बोडियाची नॉमपेन्ह ( १,०३००० लोकसंख्या ), लाओसची व्हिन्टेन हीं इतर शहरें होत.

पण ही नागरी संस्कृति शहराच्या सीमेंतच भ्रमन्ती करतांना आढळते. इन्डोचायनांतील ९०% लोक शेतीवर गुजराण करतात, आणि खेड्यांत जीवन व्यतीत करतात. फ्रेंचांच्या आगमनानें खेडेगांवांतील या परम्परागत जीवनांत खण्ड पडलेला दिसत नाहीं. नागरी संस्कृतीचें सोज्वळ स्वरूप कांहीं ठिकाणीं दिसतें तर अन्य स्थळीं तिचें भडक प्रदर्शनच पहायला मिळतें. पण या धावपळीचा, या जीवनांतील ईर्ष्येचा मागमूसहि खेड्यांत आढळत नाहीं. धर्माच्या वर्चस्वामुळें व गांवांतील श्रेष्ठ व ज्येष्ठ लोकांच्या हुकमतीमुळें ही शिथिलता आली असेल. बाम्बूच्या काठ्यावर उभा केलेल्या ग्रामीण घरांत क्वचित् मोडकेंतोडकें फर्निचर, बिछान्यासाठीं कॉटहि आढळेल. पण ग्रामीण जनतेच्या गरजाच कमी, तिथें गरजा भागविण्यासाठीं धडपड कशाला दिसेल ?

भौतिक सुधारणा, ज्ञानाचा प्रसार व कार्यक्षम राज्ययन्त्रणा या दृष्टीनीं फ्रेंचांनीं केलेली कामगिरी प्राथमिक स्वरूपाची असली तरी यापुढें होणाऱ्या प्रगतीस पायाभूत होणार आहे हें नाकारून चालणार नाहीं. फ्रेंच सरकारनें रस्ते बांधले, रेल्वे टाकली, शिक्षणप्रसारासाठीं शाळा उघडल्या, शिक्षकांना शिकवून तयार केलें, हनोईला विश्वविद्यालय उघडलें. तिथें कायदा, शास्त्र, वैद्यक व औषधें या शाखांतील उच्च शिक्षणाची व्यवस्था केली. लष्करी शिक्षणासाठीं दलात येथें महाविद्यालय सुरूं केलें. राज्यकारभाराचें शिक्षण अधिकाऱ्यांना देण्यासाठीं संस्था स्थापिली. अतिपूर्व संस्कृतीच्या संशोधनासाठीं व तान्दुळ, रबर आणि उष्ण कटिबन्धांतील रोग यांच्या संशोधनासाठीं संस्था निर्माण केल्या. पुराणवस्तुसंग्रहालयाची स्थापना केली. इस्पितळें व दवाखाने काढले. साम्राज्यशाहीच्या धोरणामुळें ही आधुनिक संस्कृति शहराच्या परिसरांतच घुटमळली, कुण्ठित ग्रामीण जीवनाला तिचा धक्का पोंचला नाहीं.

इन्डोचायना लहान देश खरा. पण तिथें खूप विविधता, वैचित्र्य आढळतें. निरनिराळे लोक, विविध भाषा, भिन्न धर्म यांनीं हा देश नटलेला आहे. अनामी, लाओसचे थाओी, कम्बोडियन, चिनी आणि दऱ्याखोऱ्यांतून व रानावनांतून राहणारे मान, म्युंग, मेओस आदि वन्य जमाती – इतके निरनिराळे लोक या लहान देशांत रहातात. अनामी, कम्बोडियन, लाओशियन इत्यादि भाषा बोलल्या जातात. आणि धर्म तर नाना प्रकारचे आढळतात. बुद्धधर्माचा प्रसार सुशिक्षितांत झाला आहे. सबंध देशावर बुद्धधर्माच्या शिकवणुकीची छाप दिसून येते. अडाणी लोकांत ( आपल्या इकडच्याप्रमाणेंच ) सचेतन वस्तूंची पूजा व भुताखेतांची आराधना केली जाते. ' एको देव: केशव: ' या उक्तीवर त्यांचा विश्वास नाहीं हें सांगावयास नको. प्रत्येक गांवची देवता वेगळी, आणि गृहदैवत वेगळेंच ! बुद्धधर्मीयांचें मन्दिर 'पागोडा'. त्यांतहि भुताखेतांना व जादूटोण्याला प्रतिष्ठा मिळते ! कॅथॉलिक खिश्चन मिशनऱ्यांनीं सोळाव्या शतकापासून आपलें कार्य सुरूं केलें याचा उल्लेख सुरवातीला आलाच आहे. २० लाख कॅथॉलिक इन्डोचायनांत आहेत. एक अगदीं नवीन प्रकारचा धर्म कोचीन – चायनांत पहावयास मिळतो. त्या धर्माचें नांव. ' काओ दाओी ' आहे चर्चप्रमाणेंच उंचउंच मनोऱ्यांचीं धर्ममन्दिरें काओ दाओी धर्माच्या अनुयायानीं बांधलीं आहेत. त्यांचा प्रार्थनेचा प्रकारहि खिश्चनाप्रमाणेंच असतो. – बॅन्डच्या










पार्श्वसंगीतावर पाश्चात्य स्वरपद्धतीनें प्रार्थना गायिली जाते. काओ दाओीचे अनुयायी आपापल्या योग्यते-प्रमाणें स्थानावर बसतात. प्रार्थनेच्या शेवटीं धर्मोपदेशक प्रसाद वाटतो. कन्फुशियसचा धर्म, ताओधर्म, बौद्ध-धर्म, ख्रिश्चनधर्म इत्यादि धर्मांत सुसंवादित्व निर्माण करण्यासाठीं म्हणून चौ नांवाच्या मुलकी अधिकाऱ्यानें १९२० च्या सुमारास या धर्माची स्थापना केली. आपल्याला 'काओदाओी' म्हणजे 'सर्वश्रेष्ठ पुरुष' वा 'ईश्वर' भेटला असें चौ सांगे. भगवान् बुद्ध, कन्फुशिअस, लाओत्से, येशू ख्रिस्त यांच्या चित्रांची व मूर्तींची काओदाईचे अनुयायी पूजा करतात. इतकेंच काय, पण सन्यत-त्सेन या चिनी राष्ट्रीय क्रान्तीच्या नेत्याच्या व व्हिक्टर ह्युगो या फ्रेंच लेखकाच्या चित्रांची ते पूजा करतात! यावरून 'काओ दाओी'च्या सर्वसंग्राहकतेची कल्पना येईल. कोचीन-चायनांतील ते–निन्ह गांवाजवळ एक विस्तीर्ण मुलुख 'काओदाओी'च्या मालकीचा आहे. इटलींतील व्हॅटिकनची यावरून आठवण होते. प्रत्येक अनुयायाला शेताचा तुकडा वहिवाटीस दिलेला असतो. त्यानें कर द्यावयाचे ते काओदाओीच्या नियन्त्रकमण्डळाला. धर्मोपदेशकांत स्त्रियाहि असतात. काओदाओीचें स्वतः-चें सैन्य आहे. त्यानें काय धुमाकूळ घातला आहे हें आपण अलीकडे वाचतोंच. काओदाओीच्या अनुयायां-तंहि फूट पडून कांहींनीं स्वतन्त्र मन्दिरें, स्वतन्त्र सैन्य यांचा प्रपंच मांडला आहे!

बौद्धधर्मीयांचा 'पागोडा' हें इन्डोचायनांतील वास्तुकलेचें एक प्रतीक आहे. अनामची राजधानी ह्यु येथें राजाच्या थडग्यांत खेळणीं, शस्त्रें नि बिछाना पुरलेला आहे. तें पाहून इजिप्तमधील पिरॅमिड व त्यांतील 'ममी'ची आठवण होते अर्थात् इन्डो-चायनामध्यें इजिप्तमधील कठिण अजस्र दगडासारखी वास्तुसामग्री सांपडत नाहीं, त्यामुळें प्रचण्ड वास्तु दृष्टीस पडत नाहींत. काम्बोडियाच्या ख्मेर राजांनीं बांधलेली राजधानी, तेथील प्रासाद व मन्दिरें याला अपवाद आहेत. जयवर्मन् या ख्मेर राजानें बाराव्या शतकांत बांधलेल्या 'अंकोर थॉम' या राजधानीचें व 'अंकोर वाट' या मन्दिराचें दृश्य जितकें भव्य तितकेंच सुन्दर आहे. पहिल्यांदा विटांनीं या वास्तू बांधल्या होत्या. नंतर लाल कुरुन्दाचा वापर करण्यांत आला व शेवटीं दुरून करड्या रंगाचा दगड मागवून नव्या वास्तू रचिल्या. 'चाम' नांवाच्या प्रतिस्पर्धी राजानें राजधानी लुटली, पण जयवर्म्यानें ती पुन्हा उभी केली! सयाम-ची हद्द अंकोरपासून शंभर मैलांवर असल्यामुळें सयामच्या स्वारीचा धोका तिला सारखा जाचत होता. इ. स. १४३२ मध्यें अचानक ख्मेर राजानें 'अंकोर'-हून राजधानी हलवली. लाखों लोक 'अंकोर'च्या आसऱ्याला राहिले होते, ते इतस्ततः पांगले. भव्य नि सुन्दर 'अंकोर' राजधानी काळाच्या उदरांत, इतिहासाच्या आवरणाखालीं गडप झाली! तिचें उत्खनन मूहे नामक एका फ्रेंच प्रवाश्यानें शंभर वर्षांपूर्वी केलें. 'टन्ले सॅप' या काम्बोडियांतील सरोवराच्या उत्तरेस जंगलामधून तो वाट काढीत होता. विचित्र आकाराचीं झाडें त्याच्या नजरेस पडलीं, म्हणून तो जवळ जाऊन न्याहाळूं लागला, तों त्या झाडांनीं तिथें पडलेल्या शिळांना विळखे घातलेले त्याला आढळले, त्या झाडांचें मूळ शोधतां शोधतां त्याला विस्मृतींत गडप झालेल्या 'अंकोर'चा शोध लागला. 'अंकोर थॉम' या शहराभोंवतीं प्रचण्ड भिंत आहे. त्यामध्यें कित्येक मन्दिरें व प्रासाद उभे आहेत. नगराच्या मध्यभागीं एक मन्दिर आहे, कित्येक देवळें त्यांत सामावलेलीं आहेत, पिरॅमिडसारखी शिखराची रचना केलेली आहे. वर मूर्ती कोरल्या आहेत, त्यांत शिवासारख्या दिसणाऱ्या चतुर्मुख मूर्ती प्रामुख्यानें उठून दिसतात. त्या मूर्ती कोणत्याहि दिशेकडून संमुख दिसतात. राजवाड्यासमोर 'हत्तीचा सौद' म्हणून आहे, तेथें गच्चीवर मोठमोठ्या दगडांवर हत्तीच्या आणि सिंहाच्या आकृती कोरल्या आहेत. यापेक्षांहि भव्य दृश्य 'अंकोर वाट' या मन्दिरभूमीमध्यें पहावयास मिळतें. चार मैल लांबीच्या भिंतीनें वेष्टिलेल्या मन्दिर-भूमीभोंवतीं खन्दक आहे, आणि पूर्वपश्चिम दोन दरवाज्यांतून वाट आहे. पाचशें एकरांच्या या वावरांत किती यात्रेकरी मावत असतील याची कल्पना केलेली बरी आंत तळीं, अतिथिगृहें, वाचनालयें नि मठ आहेत. मन्दिरें म्हणजे एकावर एक रचलेले गगनचुम्बी मजले! हिंदूंच्या रामायणांतील व महाभारतांतील कित्येक देखावे भिंतीवर किती उठावदार रीतीनें कोरले आहेत! हिन्दु संस्कृतीच्या काम्बोडियांत झालेल्या प्रसाराचें द्योतक म्हणून या देखाव्यांकडे अंगुलिनिर्देश करतां येईल.








श्री. माधवराव बागल

# अस्पृश्य मी !

‘ खुळा कुठला ! बूट रे कशाला साफ करीत बसला आहेस तूं ? नाहीं तेंच काय तरी ! अभ्यासाचं टाकून हें कशाला करीत बसावं ? कुणी सांगितलं तुला हें काम ? ’

‘ आजचा अभ्यास पुरा झाला आहे माझा. उगाच वेळ काढायचा तें आपलं कांहींतरी करीत बसलों आहे. सांगितलं नाहीं मला कुणीं ? ’

‘ बर राहूं दे आतां. करायचं तर दुसरं कांहीं तरी कर. दे टाकून तें ’

झालंच हें ! त्याला असा किती वेळ लागणार ? दुसरं आहे का कांहीं करायचं ? ’

शिवा अस्पृश्य खरा. पण आपला बूट साफसूफ करीत असलेला पाहून शालिनीला तितकंसं कांहीं बरं वाटलं नाहीं. त्याला ती आपल्याबरोबरचा मानीत नसली तरी त्यानं बूट पुसणं तिला कांहीं बरं वाटलं नाहीं. जुन्या तशा नव्या संस्कृतीचे परिणाम तिच्यावर होत होते. ती तशी सुधारकहि नव्हती आणि पुराणमतवादीहि नव्हती.

तो तिच्या पुढें दोन इयत्ता होता. हुशार होता. त्याला स्कॉलरशिपहि मिळत होती. त्यामुळें शालिनीलाहि त्याचा फायदा मिळत होता. आपल्या हातून एका अस्पृश्य मुलाचा उद्धार होत आहे या भावनेनें शालिनीच्या वडिलांनाहि एक प्रकारचें समाधान मिळत होतें. चारचौघांत सांगण्याजोगीच गोष्ट होती ती. त्यांची भूमिका कर्तव्यापेक्षां उपकाराचीच होती. त्यांना त्यांत मोठेपणा वाटत होता.

शिवरामनं मात्र त्यांच्या चांगुलपणाचा कधींच फायदा घेतला नाहीं. दर्जा सोडून तोहि कधीं वागला नाहीं. चढेल झाला नाहीं. अभ्यास आवरून करतां येईल तीं कामें आनंदानें करीत असे. अमकं काम हीन दर्जाचं, तमकं श्रेष्ठ दर्जाचं—हा विचार त्यानं शिवूं दिला नाहीं. झाडलोट, सारवण करणं, कपडे धुणं किंवा शालिनीला एखादा अवघड प्रश्न सोडवून देणं हें तो सारखंच समजे. हुषार, नम्र आणि कामाला सदैव तत्पर.

एका प्रसंगानं तर तो सर्वांनाच प्रिय झाला. त्यांत बरोबरचं नातं होतं असं कांहीं म्हणतां येणार नाहीं. पण मनुष्याला जिंकायची सेवा ही एक मोठी शक्ति आहे. गांवांत टायफॉइडची सांथ आली होती. बरींच माणसें दगावलीं होतीं. मुदतीच्या तापांत पथ्य आणि शुश्रूषा हेंच महत्त्वाचं. आईबापांची एकुलती एक मुलगी ती. शिकलेली, शाहणी, सद्‌गुणी आणि सुस्वरूप. बापाचा जीव कीं प्राण. आईचं तर तें सर्वस्व ! त्यांच्या जिवाची कोण तळमळ झाली होती ! घरीं दुसरं बायकोमाणूस किंवा वडिलधारं असं कोणी नव्हतं. दोघेहि वयानं झालेले ! इच्छा असली तरी रात्रंदिवस तिच्या उशापायथ्याशीं बसण्याची त्यांची ताकत नव्हती. पण शिवरामनं त्यांची सर्व काळजी दूर केली. न सांगतांच त्यानं सर्व जबाबदारी आपल्या अंगावर घेतली होती. शिवराम रात्रंदिवस शालिनीच्या पायाजवळ पडून असे. त्यानं आपली वळकुटी तिच्या कॉटजवळ पायाशीं पसरली होती. शालिनीचे वडील सुधारकच होते. ते शिवाशिव मानीत नव्हते. त्यांच्यामुळें त्यांच्या कुटुंबालाहि आपलीं मतें बाजूस ठेवावीं लागलीं ! तथापि तो अस्पृश्य आहे ही जाणीव कांहीं नष्ट झाली नव्हती. त्यामुळें त्यांच्या वागणुकींत तसा फरक हा राहिलाच होता. कोणी पाहुणे आले तर त्याची हुषार मुलगा म्हणून ओळख करून देत. पण आपल्याबरोबर कधीं बसवून घेत नसत ! जेवायला त्यांच्या पंक्तींत त्याला घेत नसत ! नोकरासारखाच त्याचा दर्जा होता ! पण आपल्या कर्तबगारीनें, हुषारीनें व परीक्षेंत स्पृश्यवर्गाला मागें टाकून त्यांनीं तो वाढवला होता ! यामुळें मुकुंदरावांना त्याची समाजांत ओळख करून देतांना व बोलतांना अभिमान वाटे ! अस्पृश्याच्या मुलाला आपण वाढवला, शिकवला ही गोष्ट आतां मान्यतेची झाली होती. पण यापुढें समाजाची तशीच मुकुंदरावांची मजल गेली नव्हती. या कृत्याला दानधर्मासारखं फक्त








उपकाराचं स्वरूप आलं होतं ! बरोबरीची अन् कर्तव्याची भावना अद्याप आली नव्हती !

शिवरामनं अविश्रांत सेवेमुळें त्या सर्वांचा लोभ संपादन केला. डॉक्टरला बोलावून आणणं, त्यांनीं सांगितलेलं औषध आणून वेळच्या वेळीं देणं, हांकेला जागं असणं, यांमुळें त्यानं शालिनीच्या आई-वडिलांना जराहि काम पडूं दिलं नाहीं. रात्र असो दिवस असो, त्यानं पापणी कांहीं मिटवली नाहीं. रात्रीच्यावेळीं बाबासाहेबांना किंवा आईसाहेबांना तो अगदीं जागरण पडूं देत नसे. तीं माणसं त्याला देवासारखीं वाटत होतीं. इतर लोक त्याला जमखान्यावरहि बसूं द्यायचे नाहींत. मग घरांत वावरूं देण्याची गोष्ट कशाला ? शिवरामला घरांत कुठंहि वावरायला मज्जाव नव्हता. हें काय कमी ! कुठं मिळतील अशीं माणसं ! त्यानंहि आपल्या महत्त्वाकांक्षा यापुढें नेल्या नव्हत्या. तो आपल्या दर्जाला सोडून वागत नव्हता. ते आपल्याबरोबरचे आहेत या भावनेनं तोहि वागत नव्हता. ठराविक अंतर त्यानेंहि सोडलं नव्हतं. सोडण्याचा प्रयत्नहि कधीं केला नाहीं. अंतर्यामीं तो कांटा सलत नव्हता असं मात्र नाहीं. कांहीं झालं तरी तो पण माणूसच होता. इतरांप्रमाणें त्यालाहि विकार, भावना या असायच्याच. त्यालाहि हृदय होतंच. त्या हृदयावर होणारे परिणाम तो बाहेर दाखवूं शकला नाहीं तरी एकांतीं ते प्रकट होतच ! देहांत जीव आहे तोंपर्यंत मनुष्याला यापासून आपली कशी सुटका करून घेतां येईल ? देहाच्या आचारावर संयमी माणूस नियंत्रण घालूं शकेल. पण मनाच्या व्यापारावर ताबा ठेवणं ही गोष्ट कुणाला साध्य झाली आहे ? मुक्तच मग ते ! शिवराम सामान्यांपैकींच एक माणूस !

रात्रीची वेळ ! मध्यान्ह उलटून गेली असेल. घरची मंडळी झोंपीं गेली होती. अगदीं सामसूम ! शालिनीलाहि ग्लानि आली असावी. तिची हालचाल बंद होती ! तिला त्रास होऊं नये म्हणून दिवा मिणमिणता केला होता. त्याचा मंद प्रकाश शालिनीच्या चेहऱ्यावर पडला होता ! शालिनीकडे रोखून पाहण्याचं धारिष्ट्य त्यानं आतांपर्यंत कधींच केलं नव्हतं. डोळ्याला डोळा कधींच भिडूं दिला नव्हता. मन धाव घेत असलं तरी मान सदैव खालींच रोखून धरलेली असायची. ती कुठें दुसरीकडे पहात असली तरच तो चोरट्या नजरेनें तें सौंदर्य भीत भीत लुटणार ! तिला त्याची जाणीव होऊं देणार नाहीं. रात्रीं डोळे मिटल्यानंतरच मग तें रूप त्याला पहायला मिळणार ! तिथंच तेवढं तें सुख त्याला निर्भयतेनं मनसोक्त भोगतां येणार ! दिवसा त्यानं पाहिलं असेल तर तिचे पायच ! त्यापलीकडे त्यानें डोळे उचलले नाहींत. मग शालिनीला तरी त्याच्या भावना कशा ओळखूं येणार ? तिला ती दृष्टि नव्हती. कांही झालं तरी तो अस्पृश्य होता !

या वेळीं खोलींत त्याच्याखेरीज कोणी नव्हतं ! शालिनी झोंपी गेलेली. आपण पाहतों हें समजायला तिथं दुसर कोणी नव्हतं. त्याचा तोच साक्षी.

शालिनीला ग्लानि आलेली ! वेणीफणी न झाल्यामुळें केस उशीवर पसरले होते. एखाद–दुसरा केस गालावर रेंगाळत होता. शिवरामला हेवा वाटला त्याचा. डोळा भरून शालिनीचं सौंदर्य पाहून घेण्याची संधि यापूर्वीं त्याला मिळाली नव्हती. त्याचे डोळे तेथून हलेनात. त्या सौंदर्याच्या जणु साऱ्या बारीक-सारीक खाचाखोचा तो आपल्या मनश्चक्षूंत सांठवून ठेवत होता. पुनः अशी वेळ कशी मिळणार ! तिचे डोळे, तिच्या रेखीव भिवया, तापामुळें तिच्या गालाला आलेली मोगरीची छटा, त्याला काळया कुरळया केसांनीं आणलेला उठाव ! त्याला सहजींच कल्पना येऊन गेली : 'मी चित्रकार असतों तर !' आतांपर्यंत कष्टानें आवरलेल्या भावना त्याच्या अंतःकरणाला हलवूं लागल्या. त्यानें हळुवार हातानें टेबलावर टाकलेला फोटोचा अलबम् उचलून घेऊन त्यांतला शालिनीचा फोटो तवढा चोरून घेतला. त्याच्या आयुष्यांतलें असलें पहिलेंच कृत्य हें !

शालिनी त्याच्याजवळच होती. तिच्या फोटोला त्यानें हृदयाशी कवटाळून धरलें. अन् तो एकदम उदास झाला. दुःखाचा उसासा टाकून आपल्या मनाशींच म्हणाला 'मी अस्पृश्य नसतों तर !'

इतक्यांत शालिनीचं कण्हणं त्याच्या कानावर पडलं. तो झटकन् पुढं झाला. शालिनीच्या बरगडींत कळ आली होती. तिला तक्क्याला टेकून बसावंसं वाटलं ! आई-वडिलांना यावेळीं जागं करणं शक्य नव्हतं. म्हणून आपल्याला उचलून बसविण्याकरता तिनें त्याला हांक मारली.

शिवराम पुढें झाला. त्यानें पाठीखालीं हात घातला.











शालिनीला उचलून नीट बसविलें. पण सरळ होतांना तिला कळ आली. त्याबरोबर ओणवा झालेल्या शिवरामचा तिनें आधार घेतला. दोघे अजाणतां एकमेकांच्या बाहुपाशांत पडले. शिवरामच्या अंगावर झर्रकन् कांटा उभा राहिला! अंग थरथरूं लागलं. छाती धडधडूं लागली. त्या वेळीं त्याच्या कपाळावर घाम आला. त्याच्या जन्माचं सार्थक झालं! कधीं न घडणारी गोष्ट सहजगत्या घडून गेली. पण तो ओशाळला. खजिल झाला. आपल्या हातून अक्षम्य अपराध झाला असं त्याला वाटूं लागलं.

'आपण अस्पृश्य! अस्पृश्याच्या मनांत भलत्या-सलत्या भावना उत्पन्न होऊन कसं चालेल? आपला दर्जा काय आणि मनाची धाव काय?' मनांतल्या मनांत त्यानें स्वतःला लाखोली वाहून घेतली.

अस्पृश्य पण माणूसच! हृदयांत उत्पन्न होणाऱ्या नैसर्गिक भावना आणि विकार त्याला मारून टाकतां आल्या नाहींत. परस्पर-विरोधी विचारांचें युद्ध त्याच्या मनांत चालूं झालं. आपल्या उपकारकर्त्यांच्या मुलीबद्दल आपल्या मनांत वाईट विचार आले ही त्याच्या मनाला टोंचणी लागली. पण त्या दुसऱ्या विचारांनींहि जागा सोडली नाहीं. या द्वंद्वांत दुसऱ्या भावनांचीच सरशी होत होती. त्यांच्यावर मात करणें त्याला शक्य होईना. दुसऱ्या बाजूनंहि तोच आपल्याशीं समर्थन करूं लागला: 'यांत पाप तें कसलं! मी असं केलं आहे तरी काय? माझ्या हातून अशी कोणती वाईट कृति झाली आहे? प्रेम करणं यांत पाप तें काय?'

शालिनी मात्र या विचारापासून यावेळेपावतों पूर्ण अलिप्त होती. या दृष्टीनें तिनं त्याच्याकडे कधींच पाहिलं नव्हतं. तिच्या सामाजिक दर्जामुळें ही कल्पनाहि तिला कधीं शिवली नाहीं. आपण एक उपकारकर्ते आहोंत एवढीच जाणीव ती बाळगून होती. आतांच्या त्या आजारामुळें तो थोडा जवळ आला एवढंच! त्याच्या सेवेमुळं अन् त्यानें दाखवलेल्या निष्ठेमुळें तिला थोडी अधिक आपुलकी वाटूं लागली एवढंच! तिच्या स्पर्शानें शिवरामच्या मनांत भडकलेल्या वादळाची तिला कल्पना आली नाहीं. त्या वेळी ती आपल्याच यातनेंत होती. आजारी, अशक्त आणि पाठींतल्या कळीमुळें अस्वस्थ झालेली!

शिवरामनें आपल्या हृदयांतले चोरटे विचार आपल्याशींच चोरून ठेवले. शालिनी बरी झाली. शाळेला जाऊं लागली. शिवराम पूर्ववत् अभ्यासाला लागला.

आपल्या हांतून एका अस्पृश्य मुलाचें शिक्षण पुरं करण्याचं होत आहे या भावनेनं मुकुंदरावांनीं त्याला कॉलेजचें शिक्षण पुरं करण्यास प्रोत्साहन दिलं. त्यांच्या अपेक्षेप्रमाणें त्यांना यशहि मिळालं! शिवराम बी. ए. च्या पहिल्या वर्गांत आला! त्या जिल्ह्यांतला अस्पृश्य वर्गांतला शिवराम हा पहिलाच बी. ए.! लोकांनीं दोघांचाहि गौरव केला! वर्तमानपत्रांतून शिवरामचा फोटो झळकूं लागला! साहजिकच पूर्वीहून त्याचा सामाजिक दर्जा वाढला. तथापि आपण अस्पृश्य ही गोष्ट त्याला शल्याप्रमाणें सारखी सलूं लागली! शिक्षणाबरोबर त्याच्या महत्त्वाकांक्षाहि वाढल्या होत्या. पण त्याला त्या प्रकट करण्याचं धाष्टर्य झालं नाहीं. मनांत मात्र तो गुदमरून जात होता.

शिवराम आतांशा खोलीच्या बाहेर पडत नसे. परीक्षेच्या काळजींत असेल म्हणून बाबासाहेब व आईसाहेब त्याला कसलींहि घरचीं कामें सांगत नसत. तो शालिनीच्या समोरहि जात नसे. कोणाशीं संबंध ठेवूं नये, कोणाला तोंड दाखवूं नये असं त्याला झालं होतं. शालिनीला मात्र तो आपल्याला मुद्दाम चुकवतो असं वाटूं लागलं. त्यामुळें तिला थोडं चुकल्याचुकल्यासारखं वाटूं लागलं. कारण काय असावं हें मात्र तिला कळेना! शिवरामच्या भावना ती जाणूं शकली नाहीं. पण तो बदलला होता खास! त्याचा चेहरा, त्याचा स्वभाव त्याची वागणूक सर्वच बदललेली होती. हें असं कां, हें शोधण्याची जिज्ञासा तिच्या मनांत उत्पन्न झाली!

त्याच्या खोलीचं दारं अलीकडं नेहमी लावलेलं असायचं. 'पहावं तरी काय करतो आहे' म्हणून दाराच्या फटींतून तिनं हलकेच चोरून पाहिलं! जें पाहिलं त्यानं ती फार बुचकळ्यांत पडली. तिच्या मनांत त्याच्याबद्दल दया उत्पन्न झाली. त्याचं दुःख निवारण करण्याची तिला इच्छा झाली.

शिवरामच्या हातांत कोणाचा तरी एक फोटो होता. तो तो छातीजवळ धरी. तोंडाजवळ नेई. त्याला कुरवाळी, हुंदके देऊन कांहींतरी अस्पष्ट पुटपुटत होता. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले होते! उशींत डोकं खुपसून तो लहान मुलाप्रमाणें रडूं लागला—!

शालिनीला त्याची दया आली ! ' स्वारी कुणाच्या तरी प्रेमपाशांत पडली आहे खास ! ' तिला वाटलं. 'मुलगी कोण तें पहावं, आणि बाबांना सांगून तें लग्न जमवून आणावं ! होण्याजोगं असेल तर आपण खटपट करावी. पण कोण हें समजल्यानंतरची गोष्ट ! ' याच हेतूनं तिनं दार ठोठावलं. आवाज ऐकतांच त्यानं तो फोटो झटकन् ड्राअरमध्यें टाकून दिला. डोळे पुसले. तोंडावरून पाण्याचा हात फिरवला आणि दार उघडलं !

शालिनी आंत आली ! जवळजवळ एका वयाचेच होते ते. खोलींत दुसरं कोणी नसल्यामुळें तिनं एकदमच विचारायला सुरवात केली :

" शिवराम तूं अलीकडे कसल्या काळजींत असतोस. असा कां एकलकोंडा झाला आहेस ? पहावं तेव्हां दुर्मुखलेला ! असं झालं आहे तरी काय तुला ? तुला बरं का नाहीं ? कांहीं अडचणी असल्या तर बाबांना कळव. आईला कळव किंवा मला कळव ! आम्हाला जर दूर करतां आल्या तर आम्ही दूर नाहीं का करणार ? "

" कांहीं नाहीं होत मला ! कुणी सांगितलं मला बरं नाहीं म्हणून ? निवांत अभ्यास करीत बसतों झालं. परीक्षा जवळ आली आहे. "

' काय खोटं बोलतोस रे तूं शिवराम ! मला कळलं आहे सारं ! तूं पडला आहेस कोणाच्या तरी प्रेमपाशांत ! तुला लागली आहे काळजी ती ! होय कीं नाहीं ? ओळखलं कीं नाहीं मी ? "

" छे ! कांहीं तरीच ! प्रेम ! कांहीं तरीच म्हणता आपण ! "

" कांही तरीच काय ? अस्सं ऽऽ ! मग कोणाच्या फोटोला स्वारी स्नान घालीत होती ती ! मी पाहिलं आहे सगळं ! "

शिवरामनं खालीं मान घातली ! शालिनीकडे पाहण्याची त्याची छाती होईना. शालिनीच्या प्रश्नाला उत्तर देण्याचंहि धारिष्ट्य होईना ! डोळयांतून मात्र खरोखरींच अश्रुधारा चालल्या होत्या.

' पाहूं कोणाचा फोटो तो ! ' असं म्हणून शालिनीनें ड्राअरमधला फोटो झटकन् हातीं घेतला. अगदीं अनपेक्षित अशी गोष्ट पाहण्यांत आली. तिनं फोटो पाहिला, आणि नंतर शिवरामकडे पाहिलं ! शिवराम सर्द झाला. पांढरा फटफटीत पडला ! त्याच्या पायांतली ताकत नाहींशी झाली. त्याला वर पाहण्याचं धारिष्ट्य होईना ! आपण म्हणजे मोठे गुन्हेगार असं त्याला वाटूं लागलं !

आपला फोटो शिवरामकडे असलेला तिला आवडला नाहीं. शिवरामाच्या व तिच्यामधलं अंतर आतां बाहेर पडलं ! ती शिवरामवर गरम झाली. तिच्यांतला वंशपरंपरागत ताठा जागा झाला ! एका अस्पृश्यानं आपल्याकडे त्या दृष्टीनें पहावं हें तिला बरं वाटलं नाहीं. एखाद्या हीन माणसाला टाकून बोलावं त्याप्रमाणं तुसडेपणानं ती त्याला म्हणाली :

" शिवराम, तूं स्वतःला विसरलास. प्रेमानं वागवलं म्हणून तुझा दर्जा तूं विसरलास ! तूं कोण, तुझा अधिकार काय याचा तुला विसर पडला ! बाबांनीं याकरतां तुला जवळ केलं नव्हतं ! बाबांना हें समजलं तर ते ही गोष्ट जराहि सहन करणार नाहींत. आई तुला क्षणभरहि घरीं ठेवून घेणार नाहीं. भलतीच महत्त्वाकांक्षा उरीं बाळगलीस तूं ! '

शालिनीचे शब्द त्याच्या हृदयावर कट्यारीचे घाव घालीत होते. तें रक्त बाहेर दिसत नव्हतं. पण आंत ! रक्तबंबाळ झाला होता तो ! या आघातानें त्याच्यांतलाहि स्वाभिमान जागा झाला ! तो आतां मान ताठ करून बोलूं लागला. " शालिनी ...... चुकलों ! शालिनीबाई, असा कोणता अपराध केला मी ? कोणचं पाप केलं मी ? मी मनुष्यच ना ? तुम्हींच मला माणसाप्रमाणं वागवलंत ना ? अस्पृश्यतेचा कलंक धुवून निघाला पाहिजे असा बाबासाहेबच उपदेश करीत आले ना ? मनुष्यामध्यें असणाऱ्या नैसर्गिक भावना माझ्या मनांत उद्भवल्या हा गुन्हा झाला काय ? माझ्या मनांतसुद्धां प्रेमाचे विकार उद्भवूं नयेत ? जगाला चोरून माझ्या देवीच्या प्रतिमेची मी पूजा करीत होतों. एकांतांत माझ्या हृदयस्वामिनीची मी पूजा करीत होतों हा सुद्धां मला अधिकार नाहीं काय ? माझ्या भावनेचा तुम्हाला शब्दानं किंवा कृतीनं आतांपर्यंत त्रास झाला होता काय ? तुम्ही चोरून कां पाहिलंत ? ड्रॉवर कां उघडलात ? माझं सुख कां हिरावून घेतलंत ? तें हिरावून आणखी हृदयावर कां डागण्या दिल्यात ? मी अस्पृश्य म्हणूनच ना ? मी अस्पृश्य नसतों तर तुम्ही घे घाव घातले असते का ? माझा








असा पाणउतारा केला असता का ? मी अस्पृश्य ही जाणीव करून दिली असती का ? शालिनी – शालिनी-बाई ! क्षमा करा, या पापी स्पर्शानें हें घर मी पुन्हां विटाळत नाहीं. माझ्या सावलींनं हें घर दूषित करणार नाहीं ! अस्पृश्य मी ! शिकलों, बी. ए. झालों, बॅरिस्टर झालों, अधिकारी झालों, तरी अस्पृश्यच आम्ही ! जातों बरं. शालिनी, क्षमा कर ! प्रेम केल्याबद्दल मला क्षमा कर ! भक्तिभावानें तुझी पूजा केल्याबद्दल क्षमा कर ! तेवढा फोटो बरोबर नेण्याची मला परवानगी दे ! ”

त्याच रात्रीं शिवराम घरांतनं बाहेर पडला !

त्यानं इतर कुणाला सांगितलं नाहीं. कित्येक आठवडे होऊन गेले तरी कुणाला चिठीचपाटी पाठविली नाहीं ! शालिनीच्या वडिलांना व मातुःश्रींना मोठं आश्चर्य वाटलं ! कांहीं अपघात झाला काय म्हणून काळजी वाटूं लागली !

फक्त शालिनीला तेवढं खरं कारण माहीत होतं. या धक्क्यानं तिनं अंथरुण धरलं ! शिवराम गेल्यानंतर शिवरामचे गुण तिला आठवूं लागले. त्याच्या प्रेमाची जाणीव होऊं लागली ! त्याची सेवा, त्याची निष्ठा ! डोळयांतून ओथंबणारं त्याचं प्रेम ! त्याची भक्ति ! आजारांत घेतलेली काळजी आणि त्याच्या बाहुपाशांत पडल्याचा तो प्रसंग ! एखाद्या चित्रपटाप्रमाणें आतां सारे प्रसंग सुसंगतपणें तिच्या डोळयापुढून जावूं लागले. आपण त्याच्याशीं किती कठोरपणानें वागलों याची जाणीव तिला अस्वस्थ करूं लागली. तिच्या प्रकृतीवर याचा फार परिणाम झाला ! ती अंथरूणाला खिळून राहिली. आई-वडिलांनीं तिला पुष्कळ खोदखोदून विचारलें तरी कित्येक आठवडे तिनं दाद दिली नाहीं. डॉक्टरनीं सांगितलं हा रोग मनाचा आहे, औषधानं बरा होण्याजोगा नाहीं. मुलगी एकुलती एक !

बाबासाहेब काकुळतीला येऊन म्हणाले - “ शालिनी, तू कांहींही दडवून ठेवूं नकोस. तुला काय होतंय तें आम्हांला मोकळया मनानें सांग. तुझी जी इच्छा असेल ती बोलून दाखव तुझ्याखेरीज आम्हांला जगांत दुसरं कोणी नाहीं. म्हातारपणीं आम्हाला दुःख देऊं नकोस ! सांग तुला कसली काळजी लागून राहिली आहे. ? तुझ्या कोणत्याहि इच्छेआड आम्ही येणार नाहीं. ”

बाबासाहेबांच्या सततच्या आग्रहामुळें तिनें साऱ्या गोष्टी उघड केल्या व ‘ झालेली चूक आपण दुरुस्त करू इच्छितों. तुम्ही परवानगी द्या’ म्हणून तिनं विनंति केली. त्यानंतर बाबासाहेबांच्या व शालिनीच्या आईच्या संमतीनं वर्तमानपत्रांत खालील विनंति जाहीर करण्यांत आली:

**‘ शिवराम, शालिनी तुमची वाट पहात आहे ! ’**

---

## तें विसरूं सांग कसें — !

व्यापुन तूं उरलेली
निद्रेंतिल स्वप्नासम
जिंकिलेंस हें जीवन
हक्कहि नच उरला मम

श्रावणांतली लहरी
होतिस तूं जलधारा
वृक्षांतुन भिजलेला –
थिजलेला मी वारा

अन् तुझिया हास्याचा
अर्थ मला नच कळला
दारांतिल पारिजात
अवचित मग कां फुलला ?

या साऱ्या भासांतुन
रूप तुझें साकारत
तें विसरूं सांग कसें –
भरलेलें जें मनांत ?

— तु. शं. कुलकर्णी



अनुक्रमणिका






श्री. पां. म. बापट

# 'मम वर्त्म अनुवर्तन्ते'

**श्रीमद्भगवद्गीता अध्याय ३ श्लोक २३ व अ० ४ श्लो० ११** या दोन ठिकाणीं " मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः " हें वाक्य आहे.

या वाक्याचा अर्थ दोन्ही ठिकाणीं सारखाच करावा किंवा एका ठिकाणीं एक व दुसऱ्या ठिकाणीं दुसरा कांहीं करावा ?

माझ्या मतें दोन्ही ठिकाणी सारखा अर्थ करणें युक्त. वेगळा वेगळा अर्थ करण्याची आवश्यकता नाहीं.

अध्याय ३ मध्यें भगवान् " वर्त एव च कर्मणि " असें अर्जुनाला कर्तव्याभिमुख करण्याच्या उद्देशानें आपलें कर्माभिमुखत्व सांगतात, व " मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः " हें कारण देऊन आपल्या कर्माभिमुखत्वाचें समर्थन करतात.

अध्याय ४ मध्यें भगवान् " ये यथा मां प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम् " असें अर्जुनाला विशिष्ट कर्तव्यपाठ देण्याच्या उद्देशानें आपलें विशिष्ट प्रसंगींचें वागण्याचें धोरण सांगतात, व " मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः" हें कारण देऊन आपल्या धोरणाचें समर्थन करतात.

**श्रीज्ञानेश्वरांच्या** शब्दांत :

" आमुची वास पाहावी । मग वर्तती परी जाणावी।
ते लोकस्थिति आघवी । नासिली होईल ॥
" जें भूतजात सकळ । असें आम्हां अधीनची केवळ।
तरी न व्हावें बरळ । म्हणौनियां ॥ "

याच कारणासाठीं भगवान् कर्म करीत राहिले, व राहतात, आणि याच कारणासाठीं भगवान् जशी ज्याची सेवा असेल तशी त्याची प्रतिसेवा करीत होते आणि करतात. श्रीज्ञानेश्वरांच्या शब्दांत

" येऱ्हवी तरी पाहीं । जे जैसे माझां ठायीं ।
भजती तयां मीहि । तैसाचि भजें " ॥

" भगवान् आपल्या स्वतःच्या उदाहरणानें जी वर्तती परी " शिकवितात ती :

( १ ) स्वकर्म कोणी टाकूं नये.

( २ ) तुमच्याशीं कोणीं जसें वागेल तसें त्याच्याशीं तुम्हीं वागावें.

श्रीज्ञानेश्वर " मम वर्त्मानुवर्तन्ते " याचा अर्थ अध्याय ३ मध्यें करतात, तसा अध्याय ४ मध्यें करीत नाहींत. अध्याय ३ मध्यें " माझी वर्तती परी अनुसरतात ( अनुसरतील ) " असा अर्थ करतात, तर अध्याय ४ मध्यें " मला भजतात " असा अर्थ करतात.

अर्थात् हा दुसरा अर्थ समर्थनीय आहे, परंतु माझ्या मतें " माझी वर्तती परी अनुसरतात ( अनुसरतील ) " हा अर्थ " मला भजतात " या अर्थापेक्षां अधिक सरळ आहे.

अध्याय ४ मध्यें ' मी साधूंचें परित्राण करतों, दुष्टांचा विनाश करतों ' ( " दैत्यांचीं कळें नाशीं, साधूंचा मानु गिंवशीं " ) या संदर्भांत " ये यथा मां प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम् " हें वाक्य आलें आहे. व त्यानंतर लागलींच "मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः " हें वाक्य आहे. म्हणून " लोक माझ्याशीं जसें वागतात, तसा मी त्यांच्याशीं वागतों ( साधूंशीं एका तऱ्हेनें, दुष्टांशीं दुसऱ्या तऱ्हेनें ) ; कारण, सर्वजण माझी वर्तती परी अनुसरतात " हा अर्थ सरळ दिसतो.

' यद्यदाचरति श्रेष्ठः तत्तदेवेतरो जनः । '
(' एथ वडील जें जें करिती । तया नाम धर्मु ठेवती ।
तेचि येर अनुष्ठाति । सामान्य सकळ ॥ ')

हें कारण देऊन भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला " स्वकर्म टाकूं नकोस, मी देखील स्वकर्म टाकीत नाहीं " असा उपदेश करते झाले.

" मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः " याचें कारणहि " यद्यदाचरति श्रेष्ठः–" या लोकरीतींत आहे म्हणून " वर्त एव च कर्मणि " याला " मम वर्त्मानुवर्तन्ते " हें कारण दिलें तसें " यद्यदाचरति श्रेष्ठः – " हेंहि कारण देतां येईल. कारण दोन्हींचा भावार्थ एकच आहे.










" वर्त एव च कर्मणि " प्रमाणें " ये यथा मां प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम् " ('परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां। संभवामि)' या विशिष्ट आचारप्रकारालाहि " मम वर्त्मानुवर्तन्ते० " प्रमाणें " यद्यदाचरति श्रेष्ठः० " हें कारण देतां येईल. कारण वर सांगितल्याप्रमाणें दोन्ही वाक्यांचा भावार्थ एकच आहे.

अर्जुनानें स्वकर्म टाकूं नये, त्यानें " ये यथा मां प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम् " या रीतीनें दुर्योधनादि दुर्जनाशीं व त्याच्या सहायकांशीं वागावें, "यदि मामप्रतीकारम् अशस्त्रम् शस्त्रपाणयः। धार्तराष्ट्रा रणे हन्युः तन्मे क्षेमतरम् भवेत् ॥" या अनुरूप रीतीनें वागूं नये, हा भगवान् श्रीकृष्णांचा अर्जुनाशीं ज्ञानाच्या नानाविध गोष्टी बोलण्यांत एक प्रमुख उद्देश होता व तो शेवटीं सफळ झाला.

म्हणून " मम वर्त्मानुवर्तन्ते – " या वाक्याचा अर्थ दोन्हीं ठिकाणीं " माझी वर्तती परी अनुसरतात" असाच करणें सरळ दिसतें.

" माझी वर्तती परी सर्वजण अनुसरतात " असें बोलण्यांत श्रीकृष्णांचा मनांतील भाव " अर्जुना तूं माझी वर्तती परी अनुसरावीस " हा प्रमुखतः आहे हें कांहीं सांगावयास नको. आणि अर्जुनहि भगवंतांचा भाव लक्षांत घेऊन वागला. अर्थात् तसें करण्यापूर्वी त्यानें आपल्या अनेक शंका फेडून घेतल्या.

" नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ "

असें म्हणून अर्जुनानें शेवटीं काय केलें ? त्याच्या सत्पक्षाशीं अन्यायानें वागणाऱ्या दुर्योधनपक्षाशीं " ये यथा मां प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम् " या न्यायानें त्यानें युद्ध केलें, अशस्त्र राहून प्रतिकार न करण्याचें मोहजन्य वेड टाकून दिलें.

" जशास तसें " हा " ये यथा मां–" या भगवंतांची " वर्तती परी " स्पष्ट करणाऱ्या वाक्याचा थोडक्यांत अर्थ आहे. " जशास तसें " या न्यायांत " न्याय " आहे, केवळ न्याय आहे, त्यापेक्षां अधिक श्रेष्ठ असें नीतितत्त्व, धर्मतत्त्व नाहीं, म्हणून कदाचित् श्रीज्ञानेश्वरांनीं : " ये यथा मां – " यानंतर येणाऱ्या " मम वर्त्मानुवर्तन्ते – " या वाक्याचा अर्थ सरळ " माझी वर्तती परी सर्व अनुसरतात ( तूं अनुसरावीस )" असा न करतां वेगळा केला असावा.

पण अर्जुन साधी न्यायाची भूमिका देखील समजायला मोहानें असमर्थ झाला होता, आणि त्याजकरवीं या न्यायाच्या भूमिकेचेंच कार्य करून घ्यावयाचें होतें. म्हणून श्रीकृष्णांनीं "जशास तसें" या गोष्टीवर विशेष जोर दिला हें स्पष्ट आहे.

जशी हैदराबाद-प्रकरणीं प्रमाणाबाहेर शिष्टाई करून हैदराबादच्या सत्ताधाऱ्यांची दुष्टाई सर्व शिष्टांना स्पष्ट करून दिल्यानंतर नेहरू सरकारनें " जशास तसें " या धोरणाचा अवलंब केला, तशीच शिष्टाई श्रीकृष्णांनीं करून दुर्योधनपक्षाची दुष्टाई अजमावून, नंतर "जशास तसें " हा न्यायाचा पायाभूत धर्म अनुसरण्यास अर्जुनास अनेक ज्ञानाच्या गोष्टी सांगून तयार केलें.

अर्जुन हा एक समाजधुरीण श्रेष्ठ पुरुष होता. समाजधुरीणांनीं समाजधारणेसाठीं – लोकसंग्रहासाठीं – कसें वागावें तें श्रीकृष्ण प्रामुख्यानें सांगत आहेत व लोकसंग्रहासाठीं, समाजधारणेसाठीं समाजधुरीणांनीं स्वकर्म साधकस्थितीप्रमाणें सिद्धस्थितींतहि करीत रहावें आणि दोन्ही स्थितींत समाजधारणेसाठीं समाजसेवकाशीं व समाजकंटकाशीं न्यायानें वागणें हें समाजधुरीणाचें कर्तव्य आहे असें श्रीकृष्ण अर्जुनास बजावीत आहेत. " ये यथा मां प्रपद्यन्ते – " अर्थात् प्रसंगीं

' मायाचारो मायया बाधितव्यः।
साध्वाचारः साधुना प्रत्युपेयः ॥ '

हा समाजधुरीणांचा सामाजिक धर्म आहे. खासगी बाबतींत

' मायाचारः साधुना प्रत्युपेयः ॥ '

असें 'वागलें' तरी चालेल, अशी श्रीकृष्णांची विचारसरणी दिसते. असो.

श्रीज्ञानेश्वरांस वंदन करून " मम वर्त्मानुवर्तन्ते – " वरील ही टीका त्यांच्या चिकित्सक भक्तांच्या पुढें ठेवतों.

---










प्रा. दि. के. बेडेकर

# केशवसुतांची 'स्वर्गसमक्षते'ची कल्पना

**केशवसुतांची ' दिवाळी '** ही कविता वीस शार्दूलविक्रीडितें असलेली एक लांबच लांब कविता आहे. दिवाळींतील आनंदाचें वर्णन कवीनें मोठें साधें व गंमतीचें केलें आहे. पण कवितेच्या शेवटीं मोठ्या विलक्षण दोन ओळी आहेत :

**" खाणें आणि पिणें, विनोद करणें,**
**गाणेंहि वा खेळणें**
**जैसें ज्यांस रुचेल त्यापरि तुम्हीं**
**या उत्सवीं वागणें "**

असें म्हणून कवि एकदम जणूं काय पाठमोरा होतो व म्हणतो:

**' मी संध्यासमयीं खुशाल**
**गिरणातीरावरी बैसुनी**
**कालक्षेप करीन उन्मन असा वेड्यापरी गाउनी ! '**

या पाठमोरेपणांत नुसता कवीचा विक्षिप्तपणा आहे का ? कीं आनंदाविषयीं एक बुरसटलेली तिरसट अन्हेरवृत्ति आहे ?

पण केशवसुतांच्या कवितेंत आनंदाला पाठमोरें होण्याची अशी वृत्ति नाहीं, उलट, त्यांचा एकंदर पिंड दुःखांच्या उगाळणींत रिझण्याचा नसून आनंदाच्या हव्यासानें दिव्याभासांच्या मागें बेछूट धांवण्याचा आहे. त्यांना आनंद हवा आहे. **' माझिया तर जीवितीं तिमिर सारें '** असें ते म्हणतात खरें. पण त्यांची मूळ श्रद्धा अशी आहे कीं **' तम अल्प द्युति बहु '** असून मनुष्यमात्राला ह्या द्युतीचा किंवा प्रकाशाचा लाभ होण्यासारखा आहे. त्यांना एकटेपणा हवासा वाटतो तोहि एवढ्यासाठीं कीं आनंदाचा साक्षात्कार होण्यास आजच्या ' गद्यप्रथित जगा'चा ' मठ्ठपणा ' आडवा येतो म्हणून ! त्यांनीं म्हणूनच म्हटलें आहे कीं "जनमर्यादा धरुनि कसें, अमर्याद तें मज गवसें ? ". अमर्याद आनंद त्यांना हवासा वाटतो.

## ' स्वर्गसमक्षता '

केशवसुतांच्या सुट्या एकएक कविता घेतल्या तर कधीं ' तम ' ' तिमिर ' यांत काळवंडून गेलेलें त्यांचें मन दिसतें तर कधीं **' छंद फंद उच्छृंखल अमुचे '** असे दुर्दम्य आनंदोत्साहाचे उद्गार त्यांच्या हृदयांतून उमटतात. जगाला कधीं ते पाठमोरे होतात तर कधीं बंडाचा बावटा घेऊन जनसंमर्दांत एकरूप होऊन जातात. या काव्यभावनांच्या विविधतेला नुसती सुट्या अनुभवांची रास म्हणतां येईल व प्रत्येक कवितेंतील वेगवेगळ्या संवेदनेचा सुटा अर्थ घेतां येईल. किंवा दुसरें असें म्हणतां येईल कीं, या विविधतेंत सुट्या भावनांचा विस्कळितपणा नसून कवीच्या विशिष्ट व्यक्तित्वाच्या एकसंधपणामुळें या वैचित्र्यांतहि एक परोक्ष परंतु प्राणभूत अशी **रचना** आहे. दुसऱ्या तऱ्हेनें, म्हणजे व्यक्तित्वामुळें एकंदर काव्यनिर्मितीला लाभलेल्या **रचनेचा शोध** घेण्याच्या पद्धतीनें, केशवसुतांच्या सर्व कवितांचा अर्थ पाहतां मला असें वाटतें कीं त्यांच्या काव्यप्रतिभेला व आविष्काराला एक केंद्र आहे. तें केंद्र 'स्वर्गसमक्षते'च्या त्यांच्या विशिष्ट कल्पनेंत आहे.

**' रांगोळी घालतांना पाहून '** या त्यांच्या प्रसिद्ध कवितेच्या शेवटच्या चार ओळींपैकीं आधींच्या दोन ओळी प्रसिद्धच आहेत :

**" साध्याहि विषयांत आशय कधीं**
**मोठा किती आढळे ।**
**नित्याच्या अवलोकनें जन परी**
**होती पहा आंधळे ! "**

या दोन ओळींमध्यें प्रगट झालेली कल्पना उदात्त आहे. परंतु तिला केवळ एका सुभाषिताचें रूप देऊन तिचा अर्थ संपविण्यांत येतो तें मात्र बरोबर नाहीं. केशवसुतांना तरी या दोन ओळींचा अर्थ स्वयंपूर्ण सुभाषितवजा सांगावयाचा नव्हता हें पुढील दोन ओळींवरून स्पष्ट होतें. ते म्हणतात :

**" रांगोळी बघुनी इतःपर तरी होणें तयीं शाहणें**
**कोठे स्वर्गसमक्षता प्रगटते तें नेहमीं पाहणें ! "**

त्यांना साध्या विषयांत नुसता ' मोठा आशय ' दिसत नाहीं तर स्वर्गच दिसतो. हा स्वर्गहि नुसता काल्पनिक स्वर्ग नाहीं तर तो मनुष्यमात्राला ' समक्ष ' असूं शकणारा स्वर्ग आहे. त्यांनीं दुसऱ्या एका प्रसिद्ध कवितेंत म्हटलें आहे कीं कवि, चित्रकार, शास्त्रज्ञ किंवा समाजक्रांतीचे द्रष्टे ' पृथ्वीला सुरलोकसाम्य ' आणण्यास झटत असतात. आज जरी पृथ्वीवरील मनुष्यजीवन हें ' क्लिष्ट ' असलें तरी तें वस्तुतः तसें असण्याचें कारण नाहीं. उलट, पृथ्वीवरच नंदनवन निर्माण करण्याचें सामर्थ्य मानवी बुद्धींत व हृदयांत आहे ही केशवसुतांची श्रद्धा आहे. ' स्वर्ग ' हा दुःखापासून पळून जाण्यासाठीं निर्माण केलेला कल्पनेचा गंधर्वलोक नसून मनुष्याला या जीवनांतच ' स्वर्गसमक्षता ' लाभूं शकते अशी त्यांची प्रतिज्ञा आहे.

## ' स्वर्गसमक्षते'चा आशय

केशवसुतांच्या सामाजिक क्रांतीच्या व राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें उत्स्फूर्त झालेल्या कविता समकालीन सामाजिक व वैचारिक प्रबोधनाचीं उत्कट गीतें आहेत हें खरें; पण केवळ समकालीन सामाजिक सुधारणेची तुतारी ते फुंकीत होते असा ग्रह मात्र चुकीचा ठरेल. केशवसुतांना कांहींजणांनीं ' क्रांतिकारक ' ठरवावें, कांहींनीं ' क्षीण प्रतिभेचे ' व ' स्त्रैण ' ठरवावें, आणि कांहींनीं त्यांना ' सौंदर्यवादी ' ठरवावें अशी त्यांच्या बाबतींत मोठी करुणास्पद स्थिति झालेली दिसते ! ही करुणास्पदता अर्थात् त्यांची नसून आपली म्हणजे रसिकांची व टीकाकारांची आहे. पण त्यांच्या एकंदर काव्यनिर्मितीचें ' स्वर्गसमक्षता ' हें जर केंद्र मानलें तर मला वाटतें पुष्कळसा उलगडा होईल. त्यांची ' प्रचारकी ' वाटणारी कविता एका विलक्षण, दूरस्थित परंतु प्रत्यक्ष होऊं शकणाऱ्या ' स्वर्गाची ओढ ' आहे असें दिसून येईल व त्यांच्या ' हरपलें श्रेय ' सारख्या कवितांचें नातेंहि या आदर्शावस्थेच्या चिंतनांशीं व दुर्दम्य आशावादाशीं जुळेल.

' **लहान आणि भूक आरंभीं नव्हती** ' ही त्यांची विशेष प्रसिद्ध नसलेली कविता घ्या. या छोट्याशा कवितेंत एक विलक्षण कल्पना त्यांनीं मांडली आहे. अन्न व मुखें अभिन्न होतीं, नर व नारी एकाच देहीं होती, अशी एक अवस्था त्यांनीं वर्णन केली आहे. नासदीयसूक्तामधल्या कांहीं कल्पनांचा पडसाद या कवितेंत आहे, तसाच पॅरडाइझच्या ख्रिस्ती कल्पनेच्या छटा यांत आहेत. यांत कवि शेवटीं म्हणतो कीं त्या आरंभावस्थेंत " **स्वर्ग व पृथ्वी जुळून होती** " व म्हणून मानवी जीवनामध्यें ' खंती ' निर्माण झालेल्या नव्हत्या.

सृष्टीचा जसा हा स्वर्गधरेच्या अभिन्नत्वाचा काळ कवीनें कल्पिला आहे, तसाच मानवी जीवनांतहि शैशवाचा काळहि ' खंतीं '- विना लाभलेल्या निरागस आनंदाचा असल्याचें त्यानें ठिकठिकाणीं म्हटलें आहे. पुढें 'फुलराणी' मध्यें स्वर्गधरेचा संगम होऊन आनंदाचा सर्वत्र उद्रेक होतो अशी जी उत्कट कल्पना बालकवींनीं वर्णन केली आहे तिची बीजें केशवसुतांच्या शैशवविषयक कल्पनेंत दिसतात. वर्डस्वर्थच्या कल्पनेचाहि पडसाद येथें ओळखणें सोपें आहे. परंतु, मला येथें मुख्यतः जें सांगावयाचें आहे तें असें कीं सृष्टीच्या आणि मानवाच्या एका निरागस आनंदस्वर्गाची कल्पना केशवसुतांच्या कवितेंत गाभ्यासारखी आहे.

## प्रत्यक्षांतून परोक्षाकडे

या बाबतींत केशवसुतांच्या कल्पनाविश्वाचें एक वैशिष्ट्य लक्षांत घेण्यासारखें आहे. प्रारंभकाळीं पृथ्वी व स्वर्ग यांची अभिन्नता होती व ती अभिन्नताच बालकें, फुलें व फुलपांखरें यांच्या रूपानें प्रौढ मानवाला क्षणभर कां होईना भासमान होते एवढेंच कवि सांगत नाहीं. हा जो स्वर्ग म्हणजे स्वर्भूसंगम मानवाला समक्ष होऊं शकतो, तो प्रत्यक्षांतूनच होऊं शकतो असेंहि त्यांनीं वारंवार सांगितलें आहे ' **म्हातारी**'मध्यें ते म्हणतात :

**" स्वरूप सत्य तुझें**
**मुळींहि तें मजला नुमजें**
**तरी तुझ्या ठायीं**
**वसतसें अद्भुत तें कांहीं**
**प्रत्यक्षांतुनि तें**
**परोक्षीं शीघ्र मला नेतें. "**

## ' ज्वाले'स द्यावा लागणारा बलि

प्रत्यक्षांतून परोक्ष अशा स्वर्गाकडे जाणें ही केशवसुतांच्या साऱ्या निर्मितीची प्रेरणा आहे. या निर्मितीचा










अनुक्रमणिका

अर्थ त्यांच्या दृष्टीनें स्वप्नरंजनासारखा नाहीं, तर खडतर तपश्चरणाचा किंवा कर्तव्यपालनाचा आहे. तें कर्तव्य कवीचें वेगळें, तत्त्वज्ञाचें वेगळें किंबहुना प्रत्येकाचें वेगळेंच असणार हें त्यांना ठाऊक आहेच. मनुष्याची कृतार्थता '**तेजाच्या उगमाकडे**' एकसारखें चालण्यांत आहे एवढेंच सांगून ते थांबत नाहींत. '**दिव्य ठिणगी**' या कवितेंत ते म्हणतात कीं तेजाची एकच ठिणगी पृथ्वीकडे आणण्यासाठीं "**बलि दिला ज्वालेस त्या मी किती ? तें मातें कळलें पुरें**". पण या बलिदानांतच त्यांना कृतार्थतेचा आनंद आहे. त्यांचें प्रत्यक्ष जीवनहि त्यांच्या स्वतःच्या बलिदानाची, कृतार्थतेची व आनंदाची साक्ष देणारें आहे. '**समृद्धि आणि प्रीति**' यासारख्या त्यांच्या साधारण कवितांतूनहि त्यांची ही 'स्वर्गसमक्षते'साठीं धडपड व ती 'समक्षता' प्रत्यक्ष कृतीनें साधण्याची पौरुषपूर्ण वृत्ति ओसंडतांना कोणालाहि आढळेल.

महाराष्ट्रांतील आधुनिक प्रबोधनाला असा प्रबळ काव्यात्म हुंकार लाभला हें एक मराठी भाषेचें व मराठी मनाचें सामर्थ्य-चिन्ह होय असें मी म्हणेन. केशवसुतांनीं निर्माण केलेल्या काव्यविश्वांत सामावलेलीं अनेक बीजेंच पुढच्या मराठी कवितेंत आजतागायत विस्तारत आहेत व विस्तारत राहतील, एवढें सामर्थ्य त्यांच्या प्रतिभेंत आढळतें. केशवसुतांना दिवंगत होऊन गेल्या ७ नोव्हेंबर १९५५ ला पन्नास वर्षें पूर्ण झालीं त्या निमित्तानें महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं त्यांना पुण्यस्मरण-पूर्वक श्रद्धांजली वाहण्यांत आल्या. पन्नास वर्षांनीं त्यांचें मृत्युदिनीं स्मरण करतांना आज मराठी मनाला त्या सामर्थ्याचा पुन्हा स्पर्श होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. हा स्पर्श एका तेजाचा स्पर्श आहे व '**अम्हांपुढें घनतमिस्त्र सारें दिसें**' अशा अवस्थेंत आपण असतांना त्यांचें पुण्यस्मरण हें आपल्याला फारच मार्गदर्शक ठरणारें आहे.

—

## संथ मनाच्या —

संथमनाच्या
सरोवरावर
सांजवातिला
पिंगट वारा
देतो धसके !
आजुबाजुला
पाहुन कोणी
करितो मस्ती
उगाच ... तसली
केविलवाणी !
संथ मनाच्या
पृष्ठावरती
कुठें कुठें तरी
झाली आहे
शेवाळ निळी
गुरफटलेलीं
तिच्यांत दुखरी
गांठीचीं तीं
हिरवीं हिरवीं
लाल गांगरें !

संथ मनाच्या
कोनावरतीं
मधुनच बसतीं
उसवित अपुलें
मौन पांढरें
पाकळ्यांतुनी
निळसर कमळें.
कधिं दशमीच्या
शामल रात्रीं
हंसती तारे
वलयांमधुनी
चंद्रकोरिशी.

कधीं कधीं पण
अवसेच्या त्या
कोपांतुन ये
मारित अविरत
चोंच अनावर
पाण-कोंबडी
आठवणींची.

— गजानन साळवी








श्री. वि. ग. जोशी

# माक्सिम गॉर्की आणि त्याचें काव्य

सुप्रसिद्ध रशियन साहित्यिक **माक्सिम गॉर्की** (१८६८ – १९३६) याच्या साहित्याशीं परिचित व्यक्तींची साधारणपणें ही धारणा असते कीं गॉर्की हा एकाद्या सामाजिक अंगाचें तटस्थ, बौद्धिक विश्लेषणद्वारें चित्रण करून, कठोर, नग्न सत्याशीं जनतेचा परिचय करून देणें आपलें कर्तव्य आहे असें समजणारा आणि त्या चित्रणाद्वारें जनतेमध्यें बंडाच्या ठिणग्या फुलविण्याची इच्छा करणारा असा एक यथार्थवादी कलाकार होता. तो स्वप्नदर्शीहि होता आणि त्याच्यांतसुद्धां रहस्यात्मक गूढ प्रवृत्ती वास करीत होत्या ही गोष्ट फार थोडे लोक मान्य करावयास तयार होतात.

पण खरी गोष्ट अशी कीं एकाद्या रहस्यात्मक प्रेरणेशिवाय कोणत्याहि खऱ्या कलाकाराला अस्तित्वच राहणार नाहीं. मग तो कितीहि यथार्थवादी, बुद्धिवान् आणि तटस्थ असेना ! केवळ यथार्थवादी चित्रण आणि विशुद्ध बौद्धिक विश्लेषण साहित्य होऊं शकणार नाहीं. तें तर शास्त्राचेंच एक अंग होईल. गॉर्कीच्या यथार्थवादी कथांतून आणि कादंबऱ्यांतून रहस्यात्मक प्रवाह हृदयांतील रुधिराप्रमाणें वहात आहे. तो तसा वाहिला नसता तर त्या कधींच अमर वाङ्मय-कलाकृतींच्या रांगेंत स्थान मिळवूं शकल्या नसत्या.

गॉर्कीचें साहित्य कम्युनिझमच्या प्रसारासाठीं आणि प्रचारासाठीं उपयोगी पडलें हें खरें. आणि त्यानें त्यांचा प्रचार करण्यासाठीं कांहीं एका मर्यादेपर्यंत सक्रिय भागहि घेतला होता हेंहि खरें. पण ज्या वेळीं त्याच्यातील महान् कलाकार जागृत असतो त्या वेळींच तो अंतर्जगतांतील गुप्त रहस्यात्मक प्रेरणेच्या द्वारेंच अंधकारग्रस्त जनतेमध्यें महान् आदर्शमय उच्च आशेचे उज्ज्वल किरण पसरवितो, आणि थंड गोळ्यामध्यें जीवनाची आग चेतवितो. त्याची कोणतीहि कलामय कथा अगर कादंबरी घ्या. त्यांत यथार्थ जीवनांतील सजीव पात्रांचें चारित्र्यवान् पैलू आणि सामाजिक संघर्षाचें तटस्थ चित्रण तर अवश्य सांपडेलच. पण त्याचबरोबर त्या तटस्थतेच्या अंतरंगांत एका सूक्ष्म, रहस्यमय, अपूर्व आणि महान् जीवनज्योतीच्या प्रभेनें मानवी आत्मा उजळून निघाला आहे असें आढळून येईल. नायक गर्विष्ठ, चोर वा उद्धट असो, अगर समाजबहिष्कृत लाथाडलेली बेवारशी मुलें असोत, सर्वांच्या यथार्थवादी चरित्र-चित्रणांतील अंतःप्रवाह एक अवर्णनीय अंतर्रहस्याच्या अव्यक्त स्पंदनानें तरंगित झालेला दिसतो. तें अव्यक्त रहस्यात्मक स्पंदन बरोबर जाणतां येणें अशक्य आहे. ती केवळ अनुभवाची वस्तु आहे. आणि एवढें निश्चित कीं तें अव्यक्त स्पंदनच गॉर्कींच्या किंवा कोणत्याहि महान् कलाकाराच्या प्रतिभेची साक्ष होय.

गॉर्कींचा लहानपणापासूनच कवितेकडे ओढा होता. आणि लहानपणापासून तों मृत्यूपर्यंत तो एक महान् स्वप्नद्रष्टा राहिला.

१९३३ मध्यें गॉर्कीनें प्रसिद्ध सोव्हिएट लेखक सेवोलोद आइवानोव्ह यांना म्हटलें होतें: " कोणीहि लेखक गाण्यावांचून जगूं शकणार नाहीं. लिहिण्याचा अर्थच आहे गाणें. मी प्रत्येक दिवशीं कविता लिहितों. " गॉर्की लहान होता तेव्हां त्यानें आपल्या अनाथ, असहाय आणि असमर्थ अवस्थेचें चित्रण एका कवितेच्या रूपांत पुढील शब्दांत मांडलें होतें:

" जर मी एक कुत्रा असतों–
तर मी स्वतंत्रतेनें इकडे तिकडे फिरलों असतों.
पण मी एक मुलगा आहे
आणि जो कोणी मला पाहतो —
तो रागानें म्हणतो –
' गुपचुप बसून रहा.
दुष्ट पोरा, जरामुद्धां हलूं चालूं नकोस.
नाहीं तर तुझी चामडी लोळविली जाईल. "

जेव्हां तो थोडा मोठा झाला तेव्हां रोमँटिक कविता

' धर्मयुगां'त श्री. इलाचन्द्र जोशी यांनीं लिहिलेल्या लेखाचा संक्षिप्त सारांश.

करूं लागला. त्याचे ओल्गा कामिन्सकाया नांवाच्या एका सुंदर आणि सुशिक्षित मुलीवर प्रेम बसलें. पण ओल्गा त्याच्याशीं एकनिष्ठ राहिली नाहीं. तरीहि ओल्गाची स्मृति गार्कीच्या मनांत घर करून राहिली. तिच्या निघून जाण्याच्या वेळीं त्यानें तिच्यावर एक कविता लिहिली, त्यांतील भाव असा होता :

" माझ्या स्वप्नस्थ मोहिनी !
जेव्हां तुझ्याशीं माझा प्रथम परिचय झाला होता—
आणि मी तुझ्यावर प्रेम करूं लागलों होतों –
तेव्हां मी जाणत नव्हतों कीं
मी स्वतःलाच फसवीत आहे.
प्रेम सदा वंचनेनें भरलेलें असतें – .
आणि सत्याशीं त्याचें वैर असतें –
जेव्हां स्वप्न-वांछित व्यक्ति मिळत नाहीं
तेव्हां फाटक्या गोधड्यांतून
मनुष्य एक काल्पनिक अप्सरा निर्माण करतो
आणि तिच्या काल्पनिक प्रेमसुकोमल हृदयाची
पूजा करत रहातो. "

गॉर्कीनें कांहीं रूपकात्मकहि कविता लिहिल्या. त्यांत ' मृत्यु आणि बालिका ' नांवाची एक कविता महत्त्वाची आहे. या कवितेंत कवीनें, मृत्यूवर प्रेमानें कशी मात केली, याचें सुंदर रूपक चित्रित केलें आहे. कवितेचें कथानक अशा प्रकारचें आहे : "एक राजा एका लढाईत पराभव पावून आपल्या शिल्लक राहिलेल्या सैन्यासह परत येत होता. रस्त्यांत एका झाडाच्या छायेंत त्यानें दोन प्रेमिकांना हंसण्या-खिदळण्यांत मग्न असतांना पाहिलें. त्यानें हंसण्याचें कारण विचारण्यासाठीं तरुणीला बोलावलें. ती तरुणी प्रेमालापांत इतकी मग्न होती कीं तिनें राजाच्या निरोपाची किंचित्‌हि पर्वा केली नाहीं. त्यामुळें रागावून राजाच्या अधिकाऱ्यानें अत्यंत निर्दयपणें तिचा गळा दाबून तिला ठार मारलें. परंतु मृत्यूला त्या स्त्रीबद्दल सहानुभूति वाटली. तो एका म्हातारीच्या रूपानें तिच्यासमोर अवतीर्ण झाला आणि 'एक रात्र तुला मी मोकळी सोडतों' असें त्यानें तिला म्हटलें. मात्र दुसऱ्या दिवशीं परत येण्याचें तिच्याकडून वचन घेतलें. पण मुलगी सकाळ झाली तरीहि परत आली नाहीं. तेव्हां मृत्यु तिला हुडकण्यासाठीं बाहेर पडला. त्यानें त्या मुलीला आपल्या प्रियकराच्या प्रेमांत मग्न झालेलें पाहिलें. मृत्युरूपी म्हातारीला पाहिल्यावर मुलीनें आपल्या प्रेमाची बाजू इतक्या जोरदार रीतीनें मांडली कीं म्हातारीच्या हृदयाला पाझर फुटला आणि तिनें तिला जगण्याचा अधिकार दिला. तेव्हांपासून मृत्यु आणि प्रेम खऱ्या मित्राप्रमाणें परस्परसंगतींत रहातात. "

ही कविता जेव्हां लिहिली गेली तेव्हां कोणत्याहि वृत्तपत्रानें तिला प्रसिद्धि दिली नाहीं. २५ वर्षांनंतर १९१७ मध्यें प्रथम ' नवजीवन ' नांवाच्या रशियन पत्रांत ती प्रकाशित झाली. तेव्हांहि या कवितेकडे कोणाचें विशेष लक्ष गेलें नाहीं. पुढें जेव्हां १९३७ मध्यें स्टॅलिननें या कवितेसंबंधीं "ही कविता गटेच्या फॉस्ट-पेक्षांहि अधिक महत्त्वपूर्ण आहे. यांत मृत्यूवर प्रेमाचा विजय दाखविला आहे." असें म्हटलें तेव्हां तिला प्रसिद्धि मिळाली. स्टॅलिनचा हा अभिप्राय अतिशयोक्तिपूर्ण आहे हें सांगावयास नकोच.

' वालेशियन रूपककथा' नांवाच्या कवितेंत गॉर्कीनें 'प्रेम आणि मुक्तिभावना' या दोन परस्परविरोधी अंतःशक्तींच्या संघर्षाच्या रूपकाचें चित्रण केलें आहे. माया नांवाची एक अप्सरा एका सुंदर वनांत रहात असते. ती वनापलीकडील मोकळया शेतांत प्रेमगीत गाणाऱ्या एका धनगराच्या संगीताच्या स्वरांनीं मोहित होते आणि आपल्या वनांतील नंदनवनतुल्य वातावरण सोडून ती मोकळया शेतांत त्या धनगरापाशीं जाण्यासाठीं तळमळूं लागते. बऱ्याच आंतरिक द्वंद्वानंतर शेवटीं ती आपलें चिरपरिचित सुवर्णगृह आणि सगेसोयरे यांचा त्याग करून धनगर-प्रियकराकडे निघून जाते. त्या मोकळया वातावरणांतल्या मुक्त आकाशांत भयानक मेघ अचानक गर्जना करीत वृष्टि करूं लागतात. ती अप्सरा भयभीत होऊन रक्षणासाठीं आपल्या प्रियकराचे पाय धरते. पण प्रियकर त्या वादळी वातावरणानें आनंदित होऊन निसर्गाच्या रागाच्या रौद्र संगीतांत आपला स्वर मिळवून गाऊं लागतो. नंतर माया आपल्या घरीं वनांत परत जाते. पण तेथें तिची आई आणि तिच्या बहिणी तिला पतिता ठरवून तिच्याशीं संपर्क ठेवीत नाहींत. पुन्हां ती दूरदूरच्या मोकळया शेतांवरून वाऱ्याबरोबर येणारी धनगराची ललकारी ऐकते आणि परत त्या ठिकाणीं जाते. दोघांचें प्रेम कांहीं काळपर्यंत चालतें. पण हळूंहळूं तो धनगर प्रेमाच्या बंधनांना त्रासून त्यांतून मुक्त होण्यासाठीं तळमळूं लागतो. शेवटीं प्रेमानें धिक्कारली



अनुक्रमणिका






गेलेली माया मरते आणि धनगर 'मेघांच्या मीलना'-साठीं पुढें जातो.

— या कवितेंत गॉर्कीनें अमर स्वप्नरहस्याच्या शोधांत नेहमीं आघाडीवर राहणाऱ्या मानव प्राण्याच्या अमर मुक्तीच्या आकांक्षांचें अत्यंत सुंदर रूपक चित्रित केलें आहे. ही कविता जरी १८९५ मध्यें लिहिली गेली होती, तरी प्रथमतः १९३८ मध्यें ती प्रकाशांत आली.

'बहिरीससाण्याचें संगीत' नांवाच्या कवितेंत गॉर्कीनें जमिनीवर सरपटणारे किडे आणि मोकळया आकाशांत उड्डाण करीत आपल्या प्रगतीसाठीं नेहमीं साहसानें लढत राहणारे 'बहिरी – ससाणे – पंथी' प्राणी यांमध्यें असणारें अंतर सुंदररूपकद्वारें दाखविलें आहे. कवीच्या मतानें जमिनीवर चालणारे आणि सरपटणारे जीव जीवनाच्या त्या विराट् रूपाचें दर्शन घेण्यास असमर्थ आहेत. तो म्हणतो : "जे सरपटण्यासाठीं जन्मले आहेत ते सरपटणेंच पसंत करतात. ते कधींच उडणार नाहींत." संघर्षाला न घाबरणाऱ्या स्वातंत्र्यप्रिय बहिरीससाण्याविषयीं कवि म्हणतो :

"वीरांच्या वेड्या प्रगतीसाठीं माझें हें गीत आहे ! वीरांचें वेडेपण जीवनाच्या ज्ञानाचें फळ आहे. हे वीर ससाण्या ! आपल्या शत्रूशीं संघर्ष करतांना तूं आपले प्राण गमावले आहेस. पण अशी वेळ येईल कीं, जेव्हां तुझ्या रक्ताचे उष्ण बिंदू जीवनांतील अंधकाराला नाहिसा करून आगीच्या दहकत्या ठिणग्याप्रमाणें प्रकाश देतील आणि त्यापासून अनेक वीर-प्राण स्वतंत्रता आणि प्रकाश यांच्या दुर्दम्य इच्छेंतून प्रेरणा मिळवितील !"

ही गॉर्कीची पहिली क्रांतिकारक कविता म्हणतां येईल.

ज्या कवितेला त्याची सर्वश्रेष्ठ कविता म्हणतां येईल ती कविता गॉर्कीनें १९०२ मध्यें लिहिली. त्या कवितेचें शीर्षक '**मानव**' असें आहे. या कवितेंत गॉर्कीनें मानवाच्या अमर-अनंताकडे नेणाऱ्या अनवरत प्रगतीला सजीव भावचित्रांच्या रूपांत अद्भुत सुंदर रंगांत अंकित केलें आहे. कवितेचा भावार्थ असा आहे :

"आत्मा जेव्हां अत्यंत श्रान्त होऊन उदास होतो' त्या क्षणीं मी आपल्या कल्पनेच्या साहाय्यानें मानवाच्या अपूर्व, सुंदर आणि समुन्नत प्रतिमेला आवाहन करतो. मानव ! मी त्याला आपल्या स्वप्नांत माझ्या आत्म्याच्या अंतरंगांत उदय पावणाऱ्या एका नवीन सूर्याप्रमाणें पाहतों. तो निरंतर पुढें जात चालला आहे ! तो मुक्त गर्वपूर्ण मानव !

'सर्व कांहीं मानवासाठीं आहे ! सर्व कांहीं त्याच्याच-मुळें संभवतें ! तो आपलें मस्तक आकाशापर्यंत उंच करून, स्थिर पावलें टाकीत दुर्गम मार्गावरून पुढें चालला आहे.

"अंध श्रद्धांच्या मृत राखेला पायानें तुडवीत, आपल्या अपराधांच्या धुक्यांत आपला मार्ग हुडकीत तो एकटा चालला आहे ! – नेहमींच एकटा ! भूत-कालची काळी मेघमाला त्याचा पाठलाग करीत आहे. पण तो पुढें जात आहे, – अशा ठिकाणाकडे जेथें अनंत आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें अगणित जागृत रहस्यें शांतपणें त्याच्या आगमनाची प्रतीक्षा करीत आहेत. मानवाचा तो अपार पथ अंतहीन आणि देश-कालाच्या अतीत आहे.

"हीच ती मानवाची अमरयात्रा – निरंतर पुढें पुढें जाणारी !

अपार – उच्च अभिलाषापूर्ण !
अपार – गतिशील !
अमर ऊर्ध्वमुखी"

या कवितेंत गॉर्कीनें सतत विकासशील मानवाच्या अंतःकरणांत अज्ञात रूपांत वास करणाऱ्या स्वप्नाभि-लाषेला जिवंत आणि साकार रूप दिलें आहे. या कवितेच्या संबंधीं गॉर्कीनें १९०२ मध्यें आपल्या भावी पत्नीला – मारिया आंद्रियाला हिला लिहिलें होतें —

"मी माझें हें गीत तुझ्यासाठीं पाठविलें आहे. यांतील प्रखर आणि विरक्त शब्दांत माझ्या आत्म्याचें सर्वांत प्रिय स्वप्न लपलेलें आहे. हेंच एक-मात्र स्वप्न आणि श्रद्धा मला जगण्याची शक्ति देत आले आहेत. मृत्यु कित्येक वेळीं आपल्या भयानक दांतांनीं मला भयभीत करण्यासाठीं आला. परंतु तो माझ्या या स्वप्नाला नष्ट करूं शकला नाहीं. वेडेपणा कित्येक वेळां आपल्या दाहक पंखांनीं माझ्या मस्तका-वर घिरट्या घालीत असे, आणि माझ्या कवटीच्या आंतहि त्यानें दाह निर्माण केला आहे. पण तोहि माझ्या या स्वप्नाला जाळूं शकला नाहीं. संशयाचें भूत कितीतरी वेळां माझ्या यौवनाच्या स्वप्नांच्या राखेवर अट्टाहासानें नाचण्यासाठीं आलें. पण तेंसुद्धां माझ्या










अंतरंगांत वास करणाऱ्या या स्वप्नाला आपल्या तलवारीनें मारूं शकलें नाहीं. ”

मानवांच्या महात्त्वाकांक्षांचें भविष्यकालीन कृतार्थतेचें स्वप्न गॉर्कीला सत्यापेक्षांहि सहज लाभलेलें होतें. त्याच्यांत केवळ मानवाची महामानवांत होणाऱ्या परिणतीचीच आशा दिसून येते असें नाहीं. तर त्यांत देवत्वाच्या प्राप्तीचीहि कल्पना वास करीत आहे. कवि गॉर्की असें स्वप्न पाहतो आहे कीं मानव आपल्या निरंतर प्रगतीनें केवळ विश्वाच्या रहस्यांचाच शोध करून थांबणार नाहीं, तर शेवटीं स्वतः मृत्यूवरहि विजय मिळवील.

मानवाच्या दुष्ट प्रवृत्तींचा नंगा नाच पाहिल्यावर गॉर्कीनें त्याच्या श्रेष्ठतेसंबंधीं जी एवढी भव्य कल्पना केली आहे ती वास्तववाद्याची कल्पना म्हणतां येणार नाहीं. केवळ एक विशुद्ध आदर्शवादी आणि स्वप्नदर्शी कवीच याप्रकारें विचार करूं शकतो.

रशियन क्रांतीच्या पूर्वीं गॉर्कीनें आपल्या देशांत ज्या दीन, पीडित, निर्वासित आणि पतित अवस्थेंत मानवाला सरपटणाऱ्या किड्यांप्रमाणें धुळीस मिळालेलें पाहिलें होतें, त्या स्थितींतसुद्धां मानवाच्या महान्पणासंबंधीं त्याच्या अंतरंगांत आशेची प्रकाश-ज्योति अखंड तेवतच होती. स्वतः आपल्या व्यक्तिगत जीवनांत मानवी समाजव्यवस्थेच्या विषमतेचीं फळें म्हणून कठोर आघात त्यानें सहन केले होते. तरीहि मानवाच्या उज्ज्वल भविष्यासंबंधीं त्यांस नेहमीं आशा वाटत होती. प्रत्यक्ष एकदम विरोधी आणि विपरीत उदाहरणें दिसत असतांनाहि एवढें भव्य स्वप्न केवळ क्रान्तदर्शी आदर्शवाद्यालाच पाहणें शक्य होतें. रशियन क्रांति झाली. रशियाची सामाजिक व्यवस्था बदलली. गॉर्कीनें आपल्या जीवनांतच आपल्या अंतरंगांतील स्वप्नाला बऱ्याच अंशीं प्रत्यक्षांत परिणत होतांना पाहिलें. पण आयुष्याच्या अखेरीच्या दिवसांत त्याला पुन्हां राक्षस दिसावयास लागले. मानव पुन्हां दुष्ट प्रवृत्तींच्या आहारीं जाऊं लागला आहे असें वाटूं लागलें. त्याच्या मृत्यूनंतर थोड्याच वर्षांनीं दुसरें महायुद्ध सुरूं झालें आणि मानवाच्या संस्कृतीनें जें आपले घोर जंगली रूप प्रकट केलें तें अजूनहि तसेंच आहे, एवढेंच नाहीं तर तें अधिकच बिकट रूपांत परिणत होण्याची भीति उत्पन्न झाली आहे. हीं सर्व चिन्हें पाहिल्यानंतर कवि गॉर्कीचें महान् मानवत्वाचें स्वप्न पूर्ण व्हावयास कित्येक शतकें जावीं लागतील असें वाटल्याशिवाय रहात नाहीं.

---

## दंव-बिंदु-मीलन

हरित तृणाचें कोमल पातें
मंद समीरण हालवि त्यातें
बिंदु दंवाचा वरतीं झळके
कोमल किरणीं मौक्तिक चमके
मनीं एकला तो हुरहुरतो
अवचित दुसरा तों अवतरतो
हळुहळु सरकत येउनि जवळीं
एक दुज्याला प्रेमें कवळी
दुजेपणानें विसरुनि जाती
एकरूपता झणीं पावती
मधुर सुखाचें होतां मीलन
रविकर लवकर जाई घेउन

पतिहीना ती पहात होती ।
त्याच तृणावरि गाळित मोतीं ॥

— विश्वनाथ के. महाबळेश्वरकर








प्रा. प्र. रा. दामले

# बर्ट्रंड रसेल यांचा बुद्धिप्रामाण्यवाद

'**नवभारता**'च्या सप्टेंबरच्या अंकांतील 'बुद्धिप्रामाण्य व जीवननिष्ठा' या विषयावरील चर्चा व नोव्हेंबरच्या अंकांतील श्री. सप्रे यांचा लेख हीं नुकतींच माझ्या वाचनांत आलीं. गेल्या जुलैमध्यें लंडन येथें **श्री. बर्ट्रंड रसेल** यांची गांठ पडली असतां त्यांच्याशीं ते बुद्धिप्रामाण्याचा अर्थ काय समजतात याबद्दल मला मनमोकळी चर्चा करण्याची संधि मिळाली. त्या चर्चेच्या आधारें **रसेल** बुद्धिप्रामाण्य कशाला समजतात याविषयीं व बुद्धिप्रामाण्य म्हणजे काय याविषयीं माझे विचार मी थोडक्यांत मांडणार आहे.

त्यापूर्वी ज्या चर्चेच्या वाचनानंतर हा लेख लिहीत आहे, त्याबद्दल दोन शब्द लिहितों. प्रा. दीक्षित, प्रा. आठवले व श्री. सप्रे यांचेपैकीं प्रा. आठवले आणि श्री. सप्रे यांच्या विचारसरणीशीं माझे विचार जुळतात. परंतु बुद्धिवादाची भूमिका अधिक स्पष्ट, रचनात्मक आणि व्यापक रीतीनें त्यांना मांडतां आली असती, असें मला वाटतें. व तसें त्यांनीं केलें असतें तर रसेल यांच्याशीं मतभेद दाखविणेंहि त्यांना अवश्य वाटलें असतें. प्रा. दीक्षित बुद्धिवादाचे दोष बुद्धिवादाचा उपयोग करूनच दाखवूं इच्छितात ही त्यांची पहिली अडचण. व दुसरी म्हणजे ते वर्णन करतात त्या प्रज्ञेला बुद्धीव्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्व आहे असें मानण्याला आधार असा त्यांनीं दाखविलेला दिसत नाहीं.

**रसेल** यांना भेटण्यापूर्वी मी त्यांना त्यांच्या तत्त्वविचारविषयक व माझ्या स्वतःच्या तत्त्वज्ञानांतील समजुतीबद्दलच्या कांहीं शंका पत्रानें अगोदर कळविल्या होत्या. त्यांतील पहिलीच अशी होती :

"बुद्धिप्रामाण्यवाद्यांचे आपण फार मोठे पुढारी म्हणून ओळखले जातां. पण बुद्धि म्हणजे आपण काय समजतां ? बुद्धि व अनुभव यांचा संबंध काय ? Analytic आणि Synthetic Propositions मधील (पृथक्करणात्मक व संकलनात्मक विधानांमधील) भेद आपण अंतिम मानतां काय ? नैतिक जीवनांत बुद्धीचें स्थान काय ?"

माझ्या प्रश्नावरून बुद्धिवाद मला मान्य नाहीं अशी रसेल यांची कल्पना झाली असावी; कारण "सुरवातीसच मी बुद्धिवादी आहे तो कोठच्या अर्थी हें नीट समजून न घेतां मजवर फार लोक टीका करतात. त्या सर्वांना मी येथें उत्तर दिलें आहे" असें म्हणून त्यांनीं आपला 'Human Society in Ethics and Politics' हा ग्रंथ मजजवळ दिला व 'माझी बुद्धीची व्याख्या ही ह्यूमच्या व्याख्येप्रमाणेंच आहे' असें मला आग्रहानें सांगितलें.

वरील ग्रंथांत रसेल यांनीं केलेलें स्पष्टीकरण वाचून व त्यांच्याशीं माझें जें बोलणें झालें त्यावरून श्री. रसेल हे अगदीं मर्यादित अर्थी बुद्धिवादी आहेत, व कांहीं अर्थी ते बुद्धिवादी नाहींतच अशी माझी समजूत झाली. शिवाय, त्यांची बुद्धीची व्याख्या स्वीकारली तर वैयक्तिक व सामाजिक जीवनांत जी व्यवस्था ते हितकारक समजतात ती प्रस्थापित करण्याला बुद्धीचा उपयोग होणार नाहीं. साधनें व साध्यें, मूल्यें व वस्तु यांत प्रथम पूर्ण द्वैत कल्पून मग त्यांचा संबंध जोडण्याकरितांच बुद्धि उपयोगीं पडते असें त्यांच्या लिखाणावरून वाटतें. परंतु खरोखरच आपलीं साध्यें व मूल्यें हीं आपण बुद्धिनिरपेक्ष ठरवीत असतों तर बुद्धि त्यांचें साधनहि होऊं शकणार नाहीं व निरनिराळीं साध्यें व मूल्यें यांचें योग्य महत्त्वमापन आपणांस करतां येणार नाहीं. आपल्या सर्व अनुभवांचें जागरूकपणें निरीक्षण करून त्या निरीक्षणाचा ज्ञानाला, भावनेला किंवा इच्छाशक्तीला जो उपयोग करतां येईल तो करणें हें खऱ्या विवेकी व्यक्तीचें–खऱ्या बुद्धिवाद्याचें कार्य होय. अंध अशा उत्कट भावनांच्या आहारीं न जाणें व भावनाशून्य जीवन न पतकरणें इतकेंच बुद्धीचें कार्य नसून आपल्या सर्व भावनात्मक जीवनांत त्या जीवनाच्या प्रगतीप्रीत्यर्थ सुव्यवस्था स्थापणें हें बुद्धीचें कार्य आहे. तसेंच साध्यें व मूल्यें हीं रसेल कल्पितात त्या-








प्रमाणें मनुष्याच्या नुसत्या ध्येयवादित्वावर अधिष्ठि-लेली नसून त्यांना वस्तुनिष्ठता आहे व अनुभवाचा सारासार व सर्वांगीण विचार करणाऱ्या कोणासहि त्यांचें अस्तित्व अमान्य करतां येणार नाहीं, अशीच बुद्धि-वाद्यांची भूमिका असली पाहिजे.

वस्तूंचें अस्तित्व जाणण्याला व त्यांचेशीं व्यवहार करण्याला नुसती बुद्धि पुरेशी आहे. उलट, भावनात्मक व नैतिक जीवनांत बुद्धीचें स्थान 'कुशलसाधना-' इतकेंच आहे - ही रसेल यांची भूमिका माझ्या मतें वस्तु व मूल्य (Fact and Value) हीं पर-स्परांपासून संपूर्णपणें भिन्न होत असें कल्पिते. परंतु तशी भिन्नता आहे असें मानण्यास अनुभवांत आधार नाहीं, व ती भिन्नता मान्य केल्यास बुद्धीला श्री. रसेल म्हणतात इतकेंहि कार्य करतां येणार नाहीं. वस्तूंचें अस्तित्व जाणण्याला व त्यांबाबत व्यवहार करण्यालाहि बुद्धि स्वतंत्रपणें समर्थ नाहीं. इंद्रियांचे व्यवहार गृहीत धरूनच बुद्धि हें कार्य करूं शकते. परंतु त्याचा अर्थ बुद्धि हें नुसतें साधन आहे असा होत नाहीं. तर मूल्यांबद्दलहि तेंच खरें कां नसावें ?

"तत्त्वज्ञानाचा मोठा व वाढता भाग आतां विज्ञा-नांत जमा झाला आहे, व तें ठीकच आहे. नीति-शास्त्रविषयक कांहीं प्रश्न मात्र कदाचित् तत्त्वज्ञानाचे असे कायमचे राहतील" असें रसेल मला म्हणाले. याचाहि अर्थ हाच कीं विज्ञान बुद्धीच्या साहाय्यानें वस्तुमात्राचें पूर्ण आकलन करूं शकेल परंतु मूल्यविषयक बुद्धीचें कार्य महत्त्वाचें असलें तरी दुय्यम आहे. परंतु वस्तु व मूल्य दोहोंबद्दल बुद्धि एकच कार्य करते. व तें म्हणजे अनुभवाची अनुभवाखातर सुव्यवस्था लावण्याचें कार्य होय, असें म्हटलें तरच बुद्धीचा विशिष्ट स्वभाव प्रगट होतो. श्री. रसेल यांचे वैयक्तिक व सामाजिक जीवनविषयक विचार तेजस्वी व जिवंत आहेत आणि अंधश्रद्धा व अंधभावनोत्कटता यांनीं बुद्धिवादास येणारे अडथळे त्यांनीं दूर होतात. परंतु ज्या वैयक्तिक सामाजिक ध्येयांचा ते इतक्या उत्साहानें प्रचार करितात त्यांचें ते खरोखर मूलगामी समर्थन करूं शकत नाहींत; कारण बुद्धिप्रामाण्याचा ते कांहीं अर्थीं फार मर्यादित व कांही अर्थीं अवास्तव विस्तृत असा अर्थ समजतात असें मला वाटतें. बुद्धि-प्रामाण्याचा मी म्हणतों असा अर्थ समजणें कां योग्य आहे याचें सविस्तर व सकारण विवेचन एका स्वतंत्र लेखांतच करावें लागेल.

---

## पत्रव्यवहार

## 'वैदिक शाङ्कर - अद्वैतमतानुवाद (अर्थात्) प्रस्थानत्रयभाष्याचा उपसंहार'

उपनिषत्तीर्थ श्री. द. वा. जोगकृत वरील ग्रंथाचें पं. कोगजे यांनीं केलेलें समीक्षण 'नवभारताच्या' सप्टेंबर अंकांत आलेलें वाचलें. पं. कोगजेशास्त्री यांनीं ग्रंथगुणगौरव करून वैगुण्येंहि दर्शविलीं आहेत. माझ्या मतें त्या ग्रंथांत प्रमुख वैगुण्यें आहेत तीं अशीं :

(१) वृत्तिकार, अपर, व अन्ये या तिघांचा उल्लेख आचार्य करितात त्यांची माहिती हवी होती ती मुळींच नाहीं.

(२) आचार्यांनीं प्रथम दिलेली अध्यासाची व्याख्या अव्याप्त ठरते म्हणून कार्याध्यास व कारणा-ध्यास दृष्ट्या विवेचन हवें होतें.

(३) अदृष्टार्थबोधक वेदवाक्य म्हणजे चोदना अशी आचार्यांची व्याख्या असतांना मीमांसकाची व्याख्या पत्करून केलेला अनुवाद संपूर्ण चुकलेला आहे.

(४) जगत्कर्ता ईश्वरच आहे तोच जगा-चें उपादानकारण आहे व निमित्तकारणहि आहे. तोच मायाद्वारा असाधारणकारण आहे व चेतनद्वारा निमित्तकारण आहे असें शंकराचार्यांनीं ठासून सांगितलें असतांना श्री. जोग यांनीं संभ्रम उत्पन्न केला आहे.

(५) श्रीशंकराचार्यांनीं छांदोग्यभाष्यामध्यें २१३ ठिकाणीं आभासवादच मान्य केला असता त्याचा उल्लेखहि नाहीं.

मिरज

महादेवशास्त्री दिवेकर








तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# भारतांतील सत्ताधारी पक्ष : कॉंग्रेस

कॉंग्रेस पक्षाला भारतांतील ब्रिटिशांच्या सत्तेचा वारसा मिळाला आहे. या देशांतील सर्वांत मोठा राजकीय पक्ष हाच आहे. अन्य राजकीय पक्ष त्याच्या मानानें फारच दुर्बळ व अल्पसंख्याक आहेत. आज भारतीय संघराज्यास किंवा गणतंत्रास कॉंग्रेसचें संघराज्य किंवा कॉंग्रेसचें गणतंत्र अशी संज्ञा दिली तरी भावी इतिहास या संज्ञेस अर्थपूर्ण समजेल. विरोधी राजकीय पक्षांचा विरोध विधिमंडळांत प्रकट होत असला तरी कॉंग्रेसच्या राज्यपद्धतीवर व राजकारणावर त्याचा विशेष प्रभाव पडूं शकत नाहीं. यास त्रावणकोर-कोचीन किंवा आंध्र हेच प्रांत अपवादादाखल निर्दिष्ट करतां येतात. त्यामुळें अन्य पक्षास वाव नसलेल्या फासिस्ट किंवा कम्युनिस्ट राजवट असलेल्या देशांतील एकपक्षीय राज्यपद्धतीचें साम्य कॉंग्रेसच्या राज्यपद्धतींत दिसून येतें. फरक एवढाच कीं, एकपक्षीय राज्यपद्धतीच्या देशांमध्यें अन्य पक्षांच्या संघटनेस बंदी आहे, तशी भारतांत नाहीं. एकमेव राजकीय पक्ष अत्यंत प्रभावी असल्याचीं उदाहरणें लोकशाही राज्यांच्या इतिहासांत क्वचित् सांपडतात. एके काळीं फ्रान्समधील लोकराज्यास 'रॅडिकल रिपब्लिक्' (Radical Republic) अशी संज्ञा प्राप्त झाली होती; कारण रॅडिकल पक्ष तेथें तेव्हां अत्यंत प्रभावी बनला होता.

## कॉंग्रेस प्रबळ होण्याचीं तीन कारणें

कॉंग्रेसला ब्रिटिशांच्या सत्तेचा वारसा मिळाला व अन्य पक्ष दीर्घकाळ दुर्बळ राहिले, याचीं कारणें अनेक आहेत. पहिलें व सर्वांत महत्त्वाचें कारण असें कीं, स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतच्या राष्ट्रीय चळवळीच्या कालखंडांत देशव्यापी राजकीय चळवळीचें मुख्य प्रेरक व केंद्रभूत स्थान, सबंध अर्धशतक किंवा अधिक काळपर्यंत कॉंग्रेसच बनली. १९१८ सालापासून तो १९४७ सालापर्यंतच्या कालावधींत, जनतेची स्वातंत्र्याची चळवळ हें रूप कॉंग्रेसला **म. गांधींच्या** नेतृत्वाखालीं प्राप्त झालें. तिला पक्ष हें रूप न येतां चळवळ हेंच तिचें स्वरूप अखेरपर्यंत विकास पावत गेलें. या कालावधींत कॉंग्रेसनें जें तंत्र व जो राजकीय कार्यक्रम हातीं घेतला तें तंत्र व कार्यक्रम देशांतील सर्व जमातींना व सर्व वर्गांना लागूं पडेल व झेपेल, असाच होता. राजकीय चळवळीचें म. गांधींनीं अहिंसात्मक नवें तंत्र निर्माण केल्यामुळें सर्वसामान्य जनतेला उघड रीतीनें स्वातंत्र्याच्या चळवळींत सामील होणें शक्य झालें. अहिंसात्मक तंत्रामुळेंच उदारमतवादी परंपरेंत वाढलेल्या राज्यकर्त्यांनाहि तिला दाबून टाकतां आलें नाहीं. हिंदुमुस्लीमऐक्याचा व अस्पृश्यतानिवारणाचा कार्यक्रम स्वीकारल्यामुळें या देशांतील परस्परांपासून सामाजिक दृष्ट्या विलग असलेल्या जमातींना राजकीय चळवळींत कॉंग्रेसनें ओढून घेतलें. स्वदेशीच्या व बहिष्काराच्या अर्थशास्त्राचा पुरस्कार केल्यामुळें एका बाजूनें येथील व्यापारी, कारखानदार किंवा भांडवलदार यांना या चळवळीबद्दल आत्मीयतेची भावना उत्पन्न झाली, आणि दुसऱ्या बाजूनें खेड्यापाड्यांत व शहरांत वस्ती करणाऱ्या परंतु नव्या यांत्रिक युगामुळें व ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या पिळवणुकीमुळें डबघाईस आलेल्या कारागीर व उदमी लोकांना या चळवळीबद्दल ममत्व उत्पन्न झालें. वर्गविग्रहाच्या कार्यक्रमावर भर देणाऱ्या पक्षांना सुद्धां साम्राज्यशाहीशीं विरोधी असलेल्या चळवळींत सामील होणें भाग पडलें. कारण, ब्रिटिश साम्राज्यशाहीचें वर्चस्व हें भारतीय प्रगतीच्या आड असलेल्या कारण-समुच्चयांतील सर्वांत मुख्य कारण होय ही गोष्ट वर्गविग्रहाचें तत्त्वज्ञान मान्य असलेल्या पक्षांनाहि संपूर्णपणें मान्य होती. हिंदुमुसलमानांच्या झगड्याच्या प्रश्नाला सर्वांत अधिक महत्त्व देणारे हिंदुसभा, मुस्लीम-लीग इत्यादि जातिवादी पक्ष सुद्धां ब्रिटिशसत्तेच्या विरोधास अग्रस्थान देत होते. त्याशिवाय त्यांना गत्यंतरच नव्हतें. तात्पर्य असें कीं, जो प्रश्न किंवा जो कार्यक्रम देशांतील विचारवंतांना व समाजांतील सर्व वर्गांना अत्यंत महत्त्वाचा वाटतो, आणि ज्या प्रश्नापुढें व कार्यक्रमापुढें इतर प्रश्न व इतर कार्यक्रम दुय्यम ठरतात असा प्रश्न व असा कार्यक्रम स्वीकारून कॉंग्रेसनें चळवळ केली व त्या चळवळीचें तंत्रहि सर्वसामान्य जनतेस समजणारें व झेपणारें ठेवलें. म्हणून जनतेची देशव्यापी चळवळ हें स्वरूप कॉंग्रेसला प्राप्त झालें. देशांतील इतर सर्व डाव्या व उजव्या पक्षांचें सर्वसाधारण व्यासपीठ कॉंग्रेसच्या चळवळीला लाभलें. त्यामुळेंच भारतीय जनता म्हणजे कॉंग्रेस, अशा तऱ्हेची हमी मोठ्या हिंमतीनें व अभिमानानें कॉंग्रेसचे नेते देऊं लागले. राष्ट्रापुढें असलेल्या सामाजिक, राजकीय व आर्थिक प्रश्नांना समाविष्ट करणारा










अनुक्रमणिका

साधारण लघुतम विभाजक कोणता, हें शोधून काढून त्यालाच महत्त्व दिल्यामुळें काँग्रेसला भारताच्या राजकारणांत अद्वितीय श्रेष्ठ स्थान मिळालें, व याच कारणास्तव काँग्रेसला सत्तेचा वारसा लाभूं शकला.

काँग्रेस ही सगळयांत प्रबळ होण्याचें दुसरें कारण असें कीं, स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळांत जनतेंत असंतोष उत्पन्न होऊं लागला असतांना काँग्रेसनें राज्याच्या डाव्या व उजव्या ध्येयवादाला छेद देणारा म्हणजे कांहीं अंशांनीं समाविष्ट करणारा कार्यक्रम आर्थिक नियोजनांच्या रूपानें आणि सुधारणारूप विधेयकांच्या रूपानें स्वीकारला, हें होय. लोकशाहीस अनुकूल वातावरण निर्माण करण्याकरितां अत्यंत महत्त्वाच्या अशा दोन गोष्टी काँग्रेसनें प्रथमच केल्या. वयांत आलेल्या सर्व स्त्रीपुरुषांना मतदानाचा समान हक्क दिला आणि सरंजामशाहीचीं प्रतिनिधि असलेलीं संस्थानिक–राज्यें खलास केलीं. काँग्रेसच्या राजकीय व आर्थिक कार्यक्रमांत परस्परविरोधी असलेल्या अनेक ध्येयवादांची तडजोड प्रतिबिंबित झालेली दिसते. त्यामुळें जनतेतील असंतोषाला तोंड फुटत नाहीं; आंतल्या आंत तो दबला जातो. हें तडजोडीचें स्वरूप जमीनमालकीच्या प्रश्नाच्या बाबतींत फार उघडकीस येतें. जमीनदार, कुळ व शेतमजूर याच्या हक्कांसंबंधी कायद्याच्या द्वारें प्रादेशिक राज्यें नवीन सुधारणा करीत आहेत. जमीनमालकीच्या बाबतींतल्या कायद्याचें धोरण प्रत्येक प्रादेशिक राज्यांत भिन्न प्रकारचें दिसतें. जमीनमालकीचा प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत सर्व देशांत एकसूत्रीपणा आणणारें तत्त्व दिसत नाहीं. ध्येयवादांच्या तडजोडीचें तत्त्व आर्थिक नियोजनांत अधिकच व्यक्त होत आहे. उदाहरणार्थ कम्युनिझम्, सर्वोदयवाद व भांडवलशाही या तिघांनाहि जाळयांत पकडणारें **द्वितीय पंचवार्षिक नियोजन** काँग्रेसनें आखलें आहे. लोखंड, वीज, कोळसा, यंत्रोत्पादन इत्यादि मूलोद्योगांना महत्त्व देऊन व त्यांचें राष्ट्रीयीकरण करण्याचें ठरवून रशियाच्या अनुकरणाचा भास उत्पन्न केला आहे, ग्रामोद्योगांना भांडवल व संरक्षण देऊन सर्वोदयवादाला प्रलोभन दाखविलें आहे, व मर्यादित प्रमाणांतच कापड-गिरण्या, साखर-कारखाने इत्यादि खाजगी भांडवलांच्या धंद्यांना वाव ठेवून भांडवलदारांनाहि खूष ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. ही तडजोडीची प्रवृत्ति संधिसाधुपणांतून निर्माण झाली असें मात्र म्हणतां येत नाहीं. व्यवहार्य व वस्तुवादी धोरण ठेवण्याच्या हेतूंतूनहि ही प्रवृत्ति निर्माण होऊं शकते.

या देशांत डावे किंवा उजवे गट दुर्बळ राहून काँग्रेसच प्रबळ राहिली आहे याचें तिसरें कारण असें आहे. डाव्या किंवा उजव्या ध्येयवादांच्या ऊर्जित अवस्थेचा काळ दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस समाप्त झाला. पहिलें महायुद्ध समाप्त झालें व दुसरें महायुद्ध सुरू झालें – या दोन जागतिक घटनांच्या दरम्यानचा काळ डाव्या व उजव्या ध्येयवादांच्या अनिवार्य विरोधावस्थेंतून उत्पन्न होणाऱ्या संग्रामाचा काळ होता. आज जरी कम्युनिस्ट राष्ट्रगट व लोकशाही राष्ट्रगट यांच्यांत शीतयुद्ध चालूं असलेलें दिसत असलें तरी या युद्धाचा पाठपुरावा करणारा ध्येयवादांचा विरोध बुद्धीच्या क्षेत्रांत कुंचबल्यासारखा झाला आहे. सामाजिक ध्येयवाद म्हणजे प्रयोगानें पारखलेलें वैज्ञानिक सत्य नव्हे, तर तो अनेक गृहीत कृत्यांनीं भरलेला व प्रयोगाची गरज असलेला आनुमानिक तत्त्वप्रपंच आहे, असें आधुनिक तर्कशास्त्र जाहीर करूं लागलें आहे. कारण सामाजिक शास्त्रांतील नियम हे भौतिक विज्ञानांतील नियमांप्रमाणें गणिती पद्धतीचे कांटेकोर नियम नाहींत. त्यांत अनेक विकल्प (Alternatirces) व अपवाद मोठ्या प्रमाणांत सांपडतात. गणिती पद्धतीचे कांटेकोर नियम भौतिक विज्ञानांत सांपडत असल्यामुळें त्या बाबतींत भविष्यवाद खरे ठरतात. यंत्रें व रासायनिक द्रव्यें, अमुक एका गुणधर्मांचीं, हमखास रीतीनें घडवितां येतात; ताशीं ८० मैल जाणारी मोटार व ७०० मैल जाणारें विमान त्या नियमांप्रमाणें हमखास बनवितां येतें. रासायनिक द्रव्याचे कच्चे रंग कोणते व पक्के रंग कोणते, हें निश्चित सांगतां येतें. परंतु त्याप्रमाणें सामाजिक शास्त्रांच्या आधारानें आर्थिक व सामाजिक संस्थांची गति व गुण मोजतां येत नाहींत किंवा निश्चितपणें सांगतां येत नाहींत. वर्गरहित समाजरचनेचा प्रयोग मोठ्या निकरानें व मोठ्या निग्रहानें रशियांत केला गेला. तेथें जुने आर्थिक वर्ग नष्ट झाले खरे, परंतु नवे वर्ग उत्पन्न झाले. राजकीय सत्ताधारी वर्ग व हुकूम पाळणाऱ्यांचा वर्ग, असे दोन वर्ग तेथें स्पष्टपणें अस्तित्वांत आले आहेत. इंग्लंडमध्यें मजूर व गरीब जनतेची स्थिति क्रांतीवांचून सुधारली असून तेथील समाजसंस्थेंत समतेचें






प्रमाण दर दहा वर्षांनीं हमखास रीतीनें वाढलेलें दिसतें. तात्पर्य, तर्कशास्त्राच्या कसोटीनें व अनुभवानें पाहतां सामाजिक ध्येयवादांमधील सत्य कांटेकोरपणें खरें नसतें, असें म्हणावें लागतें. त्याला अपवाद असतात व ते अपवाद पुष्कळच असतात. इंग्लंड, फ्रान्स व इटली या देशांतील डावे व उजवे पक्ष यांच्या राजकीय व आर्थिक कार्यक्रमांत फार अंतर राहिलेलें नाहीं. इंग्लंड-मध्यें तर असें दिसून येतें कीं, उजवा पक्ष अधिकारारूढ झाल्यानंतर तो डाव्या पक्षानें पूर्वीच्या स्वतःच्या राजवटींत केलेल्या ज्या सुधारणा असतात त्यांनाहि अधिक स्थैर्य देण्याचा प्रयत्न करीत असतो. डाव्या पक्षानें सुधारणा निर्माण करावयाच्या व उजव्या पक्षानें त्या स्थिर करावयाच्या असा इंग्लंडमधील वर्तमान राजकीय इतिहासाचा अर्थ होऊं लागला आहे. इंग्लंड-मधील वर्गविग्रहाची धार अगदीं बोथट होऊन गेली आहे व वर्गांच्या मधील वैषम्यहि घटत चाललें आहे. डाव्या व उजव्या ध्येयवादांच्या विरोधावस्थेला सौम्य स्वरूप येत चालल्याचें हें दर्शक चिन्ह होय. संपत्ति-धारी वर्ग स्वतःच्या हितसंबंधांना पडत चाललेल्या मर्यादांचें स्वागत जरी करीत नसले तरी त्या मर्यादांना मान्यता देऊं लागले आहेत. भांडवलशाहीची सद्दी संपली, ही गोष्ट भांडवलशाही वर्गांना मान्य झाल्याची ही निशाणी आहे. म्हणून भांडवलशाही – विरुद्ध – समाजवाद किंवा हुकूमशाही – विरुद्ध – लोकशाही असा ध्येयवादविषयक झगडा बुद्धीच्या किंवा विचारांच्या क्षेत्रांत टिकाव धरीनासा झाला आहे. समाजवाद व व लोकशाही यांना बौद्धिक मान्यता मोठया प्रमाणांत मिळून चुकली आहे. प्रत्यक्ष आचरणांत तडजोडीचा प्रकार दिसून येतो. फरक इतकाच कीं, भांडवलशाहीला अधिकाधिक मर्यादा पडत आहेत. परंतु हुकूमशाही मात्र लोकशाहीच्या नांवानें प्रबळ होण्याचा संभव वाढत आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर झालेल्या अनेक कॉंग्रेस अधिवेशनांच्या मध्यें वेळोवेळीं ध्येयवाददर्शक व कार्यक्रमासंबंधीं जे ठराव संमत झाले, त्यांवरून असें दिसून येतें कीं, कॉंग्रेसनें डाव्या ध्येयवादाचा मर्यादित प्रमाणांत स्वीकार व पुरस्कार केलेला आहे. सहकारी लोकराज्याचें ध्येय पुकारून आर्थिक व राजकीय क्षेत्रांतील भांडवलशाहीचा आणि हुकूमशाहीयुक्त समाजवादाचा संपर्क होऊं न देतां, आर्थिक समता व लोकशाही स्थापावयाची, असें दर्शित केलें. वर्गहीन समाजरचनेची ध्येय म्हणून घोषणा करून कम्युनिझमचा ध्येयवाद मर्यादित अर्थानें मान्य केला. मर्यादित म्हणण्याचें कारण कीं, वर्गविग्रहाचें व कामगार-हुकूमशाहीचें कम्युनिझम-मधील तत्त्व अमान्य ठरविलें; व संसदीय लोकशाहीच्या बळावर वर्गविषमतेची धार बोथट करणारा कार्यक्रम अमलांत आणून हळूहळूं वर्गावर्गांच्या मधील आर्थिक विषमता कमी करतां येईल असा विश्वास व्यक्त केला. गतवर्षी झालेल्या आवडी येथील कॉंग्रेस-अधिवेशनांत **समाजवादी आकाराची अर्थरचना** उत्पन्न करण्याचें ध्येय जाहीर केलें. समाजवादी आकाराची अर्थरचना असें सांगतांना हीहि गोष्ट स्पष्ट करण्यांत आली कीं, जगांत अन्यत्र समाजवादी पक्षांनीं अधिकृत रीतीनें मान्य केलेल्या प्रकारची ती अर्थरचना असणार नाहीं. त्यांत अलग असें भारतीय वैशिष्ट्य राहील. हें भारतीय वैशिष्ट्य कोणतें, याबद्दल मात्र निश्चित असा खुलासा सांपडत नाहीं; परंतु तो थोडासा अनुमानितां येतो. ग्रामोद्योगांना या अर्थरचनेंत योग्य तें स्थान मिळणार आहे; खाजगी भांडवलाला कांहीं प्रमाणांत अवसर राहील; राजकीय दृष्टिकोणांत सर्वोदयाच्या तत्त्वाचा प्रभाव राहील; व कोणत्याच एका मार्क्सवादासारख्या विचारसरणीचा कट्टर रीतीनें, एकमेव शुद्ध संप्रदाय म्हणून, अंगीकार केला जाणार नाहीं. अशा तऱ्हेचा अर्थ भारतीय वैशिष्ट्य म्हणून सूचित होतो.

**नव्या महासमन्वयाची शक्यता**

या संदर्भांत ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, कॉंग्रेसपाशीं पक्ष या नात्यानें आवश्यक असणारी सुस्पष्ट व सुसंगत अशी तात्त्विक व्यापक विचारसरणी सांपडत नाहीं. पाश्चात्त्य राष्ट्रांत किंवा कम्युनिस्ट राष्ट्रांत उत्पन्न झालेल्या महत्त्वाच्या पक्षसंघटना, विवक्षित व व्यापक विचारसरणीच्या किंवा जीवनविषयक तत्त्वज्ञानाच्या म्हणजेच एका विशिष्ट ध्येयवादाच्या आधारानें झालेल्या दिसतात. परंतु याचा अर्थ असा नव्हे कीं, प्रत्येक भिन्न पक्षाची भिन्न विचारसरणी असावी लागते. पक्षभेदास विचारसरणीशिवाय अन्यहि अनेक कारणें लागूं पडतात. असें असलें तरी व्यवस्थित व प्रबल पक्षसंघटनेस, सुस्पष्ट व व्यवस्थित विचारसरणीचें साधन फार उपयोगी ठरतें. आजपर्यंत








परंपरागत अशा राष्ट्रवादी विचारसरणीच्या प्रेरणेनें काँग्रेसची राष्ट्रीय चळवळ वाढली व सफळ झाली. आतां भूतकालीन अध्यात्म व समाजसंस्था यांच्या श्रद्धेवर आधारलेला परंपरागत राष्ट्रवाद अपुरा पडतो. कारण, भूतकालावरील श्रद्धा भविष्यकालीन प्रगतीच्या मार्गावर प्रभावी प्रकाश टाकूं शकणार नाहीं. भूतकालावरील श्रद्धा कांहीं अंशीं अनेक अडथळेच उत्पन्न करील, ती बंधनभूतच ठरेल. जुनी समाजसंस्था नव्या राजकीय व आर्थिक कार्यक्रमाला प्रतिकूल आहे. परंपरागत अध्यात्मवाद हा या इंद्रियगम्य जगांतील जीवन संपन्न व सुसंस्कृत करण्याच्या ऐहिक आकांक्षांना पोषक होऊं शकत नाहीं. कारण त्या अध्यात्मवादाच्या दृष्टीनें इंद्रियांचे विषय हीं बंधनें ठरतात! म्हणून परंपरागत राष्ट्रवाद नव्या आकांक्षांना व नव्या ध्येयांना कमी लागू पडतो. वेद, उपनिषदें, त्रिपिटक, धम्मपद, गीता, जिनागम व पुराणें यांच्यांतून जीं श्रद्धेय तत्त्वें उत्पन्न होतात, त्यांच्या योगानें या नव्या युगाचा ध्येयवाद निर्माण होऊं शकत नाहीं. त्यांनीं दाखविलेलें जीवनाचें व विश्वाचें चित्र बऱ्याच अंशीं कल्पित ठरलें आहे व बाधितहि झालें आहे. म्हणून भौतिक व सामाजिक विज्ञानें जीवनाचें व विश्वाचें जें निराळें चित्र आधुनिक मानवाच्या मनांत निर्माण करीत आहेत त्यांच्याच आधारानें नवा ध्येयवाद घडविला पाहिजे. अर्थात् तो ध्येयवाद कांटेकोर व सांप्रदायिक स्वरूपाचा असूं शकेल असें नाहीं.

सर्वोदयाचा ध्येयवाद हाहि काँग्रेसनें संपूर्णपणें स्वीकारलेला नाहीं. तो म. गांधी व त्यांचे अनुयायी यांनीं मांडलेला आहे. हा ध्येयवाद धार्मिक स्वरूपाचा आहे. जगांतील धर्मग्रंथांचें व उपनिषदांचें किंवा संतांचें अध्यात्मदर्शन हें सर्वोदयवादाचें अधिष्ठान आहे. सर्वोदयवादाचीं नैतिक तत्त्वें, जीवनपद्धति, सामाजिक आदर्श व आर्थिक कार्यक्रम निश्चित स्वरूपाचा आहे. परंतु त्याचें अध्यात्मदर्शन अस्पष्ट व गूढ आहे. त्यांतील ईश्वर, परमात्मा किंवा आत्मा या संबंधाचें विवरण गूढवादी ( Mystic ) स्वरूपाचें आहे. या सर्वोदयवादाची छाप काँग्रेसमधील कांहीं महत्त्वाच्या सभासदांच्या मनावर जरी दिसत असली, तरी काँग्रेसपक्षाचा ध्येयवाद म्हणून त्यास कधींच मान्यता मिळालेली नाहीं. दुसरें असें कीं, विज्ञान व यंत्रयुग यांच्या अधिष्ठानावर उभारलें जाणारें आधुनिक पद्धतीचें समाजतंत्र व राज्य निर्माण करण्याचा कार्यक्रम काँग्रेसनें राज्यसत्तेच्या द्वारें हातीं घेतला आहे. विज्ञानाश्रित औद्योगिक क्रांतीच्या अर्थशास्त्राची आराधना करूनच या कार्यक्रमाची प्रगति होणार आहे. या कार्यक्रमांत सर्वोदयानें दर्शित होणारी आदर्श जीवनपद्धति समाविष्ट होऊं शकत नाहीं किंवा ग्रामोद्योगप्रधान अर्थशास्त्रहि बसूं शकत नाहीं. ओढाताणीचा व दूरान्वित अर्थ करूनच सर्वोदयवादाचा स्वीकार काँग्रेस करूं शकेल. त्यांत सर्वोदयवादाचें हाल होतील, काँग्रेसचे नव्हे! प्रचंड पोलादी कारखान्याच्या व कामगारवसाहतीच्या आवारांत ब्रह्मचारी मारुतीचें मंदिर जसें एका कोपऱ्यांत शोभून दिसावें, तसेंच आधुनिक पद्धतीचें राज्ययंत्र चालविण्यास बद्धपरिकर झालेल्या काँग्रेसच्या परिसरांत सर्वोदयवाद शोभून दिसेल. सर्वोदयवादांतील अव्यक्त व सामान्य नैतिक तत्त्वांचा जयघोष केला म्हणजे सर्वोदयवाद स्वीकारला असें होत नाहीं. तीं नैतिक तत्त्वें मानवसंस्कृतीची सर्वमान्य अशी आध्यात्मिक संपत्ति बनली आहे. सर्वोदयवादाचें वैशिष्ट्य सामान्य व अव्यक्त नैतिक मूल्यें नव्हेत, तर विशिष्ट प्रकारची जीवनपद्धति होय. आधुनिक यांत्रिक संस्कृतीच्या पोटीं जन्माला आलेल्या जीवनपद्धतीचा तो ( antithesis ) प्रतिपक्ष आहे. हा प्रतिपक्ष नव्या जगाला धोक्याचा इशारा देऊन आव्हान करीत आहे. हा इशारा व हें आव्हान काँग्रेसराज्याच्या कार्यक्रमालाहि लागूं पडतें. सर्वोदयाच्या जीवनपद्धतींत गोमयाला महत्त्व आहे, सिमेंट-कांक्रीटला नाहीं. सर्वोदयाचा गोमययुगाकडेच ओढा आहे. उलट काँग्रेसचीं नवीं आर्थिक नियोजनें, गोमय-युग ठेवावयाचें नाहीं अशा प्रतिज्ञेनें तयार होत आहेत.

काँग्रेस ही, एक राजकीयपक्ष म्हणून, सत्ता वापरीत असल्यामुळें व पक्षाला निश्चित विचारसरणी व ध्येयवाद यांची गरज असते असा एक प्रसिद्ध संकेत असल्यामुळें काँग्रेसच्या ध्येयवादासंबंधीं वर चर्चा केली. काँग्रेसचा ध्येयवाद हळूहळू स्पष्ट व निश्चित होत जाईल अशी मात्र शक्यता दिसत आहे. हा ध्येयवाद गेल्या पन्नास वर्षांतील म्हणजे विसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील डाव्या किंवा उजव्या ध्येयवादांपैकीं असणार नाहीं, हें जरी खरें असलें, तरी आज जगांत जें








वैचारिक मंथन सुरूं आहे आणि शांततामय विश्व-समाजाच्या स्थापनेकरितां प्रयोग व धडपड सुरूं आहे, त्यांतूनच निर्माण होणें संभवनीय आहे. कॉंग्रेसचें नेतृत्व या बाबतींत स्वदेशाच्या राजकारणांत व जागतिक राजकारणांत महत्त्वाचें मार्गदर्शन करीत आहे. म्हणून एक नवा वैचारिक समन्वय तयार होण्याचा फार मोठा संभव आहे. सांप्रदायिक पद्धतीचे ध्येयवाद म्हणून समाजवाद, कम्युनिझम्, राष्ट्रवाद, फासिझम् इत्यादी आधुनिक कालांत गाजले आहेत. समाजान्तर्गत व आंतरराष्ट्रीय संग्राम या ध्येयवादांनीं चेतविले आहेत. समाजान्तर्गत व आंतरराष्ट्रीय संग्रामावस्थेला नामोहरम करणारा व सर्व राष्ट्रांच्यामध्यें परस्पर सहकार्य उत्पन्न करून सौजन्यपूर्ण प्रयत्नांना आवाहन देणारा असा नवा समन्वयात्मक ध्येयवाद निर्माण व्हावा म्हणून जी पूर्वतयारी व्हावी लागते तशी तयारी **पं. जवाहरलाल नेहरू** यांच्या नेतृत्वाखालीं होत आहे. विशेषतः जागतिक राजकारणांच्या आघाडीवर **पंचशीलाचा कार्यक्रम** गाजत आहे. त्या कार्यक्रमाला दृढमूलता जेव्हां येईल तेव्हांच असा नवा वैचारिक महासमन्वय प्रकट होईल.

### अन्तर्विरोध : पक्षसत्ता कीं लोकसत्ता ?

असा वैचारिक महासमन्वय तयार होण्यास आवश्यक अशी भारतीय पार्श्वभूमि निर्माण होणें अत्यंत जरूरीचें आहे. अशी पार्श्वभूमि कॉंग्रेसच्या स्वरूपांत तयार होत आहे काय ? – याचें निश्चित उत्तर मिळूं शकत नाहीं. कॉंग्रेस ही जनतेची चळवळ एवढ्याच एका स्वरूपांत जनतेंत नांदत होती तोंपर्यंत तिचा विकास झाला व तिची उन्नति झाली. कॉंग्रेस हा एक सत्ताधारी पक्ष म्हणून नांदूं लागल्यानंतर तिचा विकास मंदावत चालला. एक महत्त्वाचा अंतर्विरोध उत्पन्न झाला. लोकशाही जीवन निर्माण करणारी जनतेची चळवळ, असें स्वरूप तिला मिळणें हें क्रमप्राप्त होतें. लोकशाही राज्य अशा चळवळीशिवाय स्थिरावत नाहीं किंवा दृढमूल होत नाहीं. ती सत्ताधारी पक्ष बनल्यामुळें तिला एकांगी व एकदेशीय स्वरूप प्राप्त झालें. म्हणजे पक्षांतील लोक व पक्षाबाहेरील लोक अशी जनतेची विभागणी झाली. सर्व जनता कोणत्याहि एका पक्षाच्या संकुचित चौकटीत मावूं शकत नसते. एका अवयवांत जसें शरीर समाविष्ट होत नसतें, किंवा एका भागांत संपूर्ण वस्तु जशी मावूं शकत नसते तसेंच एका पक्षांत जनता मावूं शकत नाहीं. चळवळीचें तसें नसतें. चळवळ ही पर्जन्यासारखी अगर वायू – किंवा – प्रकाशाप्रमाणें सर्वत्र पसरूं शकते. उलट, पक्ष हे नद्यांसारखे असतात.

कॉंग्रेस हा सत्ताधारी पक्ष बनल्यामुळें नोकरशाही व जनता यांच्याहि अंतर्विरोधांत ती सांपडली आहे. नोकरशाहीची प्रवृत्ति, सरकार या संस्थेमध्यें सत्ता केंद्रित करण्याकडे असते. सरकारनें सत्ता वापरावी व लोकांनीं सत्तेपुढें नमावें असा नोकरशाही खाक्या असतो. या नोकरशाहीच्या प्रवृत्तीला नवीं पंचवार्षिक नियोजनें अधिक बळकट करतील, असा संभव वाटूं लागला आहे.

कॉंग्रेसमधील तिसरा अंतर्विरोध म्हणजे पक्षीय सत्ता वाढवावी कीं लोकसत्ता वाढवावी, या संबंधाचा आहे. कोणताहि एक राजकीय पक्ष कितीहि मोठा, प्रभावी व जनहिताचा कार्यक्रम पुढें घेऊन आलेला असला तरी त्याच्यामध्यें समाजांतील गुणी, कार्यक्षम व जनहितदक्ष सर्व व्यक्तींचा समावेश होऊं शकत नसतो. पक्षांतील अधिकारपदस्थ जबरदस्त व्यक्ती अनेक चांगल्या लायक लोकांना पक्षांत येण्यास अडथळा करीत असतात किंवा पक्षविषयक मर्यादा अमान्य असलेले लोक आपखुषीनें बाहेर राहिलेले असतात. अनेक कारणांस्तव पक्षाच्या बाहेर राहिलेल्या कार्यक्षम व सौजन्ययुक्त अशा लोकहितकारी व्यक्तींना अधिकारारूढ पक्ष बाजूस फेकीत असतो. खरीखुरी राजकीय सत्ता ज्या प्रमाणांत जनतेस लाभूं लागते त्या प्रमाणांत पक्षाच्या बाहेर असलेल्या व्यक्तींनाहि योग्य स्थान सत्तेच्या क्षेत्रांत लाभूं लागतें. पक्षाच्या बाहेर सत्ता राहील व जनतेला राजकीय सत्ता अधिकाधिक लाभेल असा राज्यरचनेचा कार्यक्रम कॉंग्रेसनें हातीं घेतला तरच पक्षसत्ता कीं लोकसत्ता या द्वंद्वांतून तिची सुटका होईल. अशा तऱ्हेचा कार्यक्रम राज्यद्वारा व विशेषतः कॉंग्रेसच्या संघटनेच्या द्वारां अमलांत आणण्याचा मुख्य उद्देश दृष्टीसमोर ठेवून जर कॉंग्रेसची संघटना काम करूं लागली तर कॉंग्रेसला जनतेची महान् चळवळ हें स्वरूप पुनः प्राप्त होईल व संकुचित पक्षाचें एकदेशीय रूप राहाणार नाहीं.

### कांहीं अवलक्षणें

जनतेचें राजकीय स्फूर्तिस्थान व जनतेच्या राजकीय








जीवनाच्या आकांक्षांचें आविष्करण हें रूप कॉंग्रेसला होतें तें आतां लोपत चाललें आहे. अशा तऱ्हेचें स्वरूप लोपत जाण्याचीं सूचक अशीं पांच अवलक्षणें कॉंग्रेस-मध्यें दिसूं लागलीं आहेत.

पहिलें अवलक्षण असें:– राजकीय स्पर्धाक्षेत्रांतील अन्य राजकीय पक्ष दुर्बळ राहिल्यामुळें व जनतेची व्यापक राष्ट्रीय चळवळ या पूर्वेतिहासाचा जागृत संस्कार जनतेच्या मनावर असल्यामुळें, सत्तेच्या स्पर्धेत अत्यंत उपयोगी पडणारें निवडणुकीचें यंत्र, एवढाच कॉंग्रेसचा उपयोग कॉंग्रेसचे कार्यकर्ते करून घेऊं लागले आहेत. कॉंग्रेस ही निवडणुकीचें एक यंत्र म्हणूनच तिची जोपासना सगळीकडे सुरूं झाली आहे. कॉंग्रेसची पूर्वीची राष्ट्रीय चळवळ देशाच्या कानाकोपऱ्यापर्यंत पसरली होती. चळवळीचीं केंद्रें जिल्ह्याच्या किंवा तालुक्याच्या गांवांपर्यंतच नव्हे, तर लहान गांवें व खेडीं यांच्या पर्यंतहि पसरलीं होतीं. म्हणून हीं निवडणुकीचीं यंत्रेंहि तितक्याच प्रमाणांत पसरलेलीं दिसतात. जुने चळवळे कार्यकर्ते आणि नवे सत्ताभिलाषी लोक अशांचेंच संमेलन या यंत्राच्या केंद्रांत अनेक ठिकाणीं होऊं लागलें आहे. थोड्याच मोजक्या जुन्या कार्यकर्त्यांच्या ठायीं रचनात्मक कार्यक्रमाची कळकळ शिल्लक राहिली आहे व त्यांतीलहि फारच थोड्यांना रचनात्मक कार्यक्रमाची हातोटी साधली आहे. वस्तुतः पूर्वीचे बरेच लोक चळवळे आहेत. त्यांची आज वस्तुतः गरज नाहीं; कारण, भावनाविवश अशा उठावाची चळवळ आतां आवश्यक नाहीं. आज शांत व स्थिरपणें विधायक कार्यें दीर्घकालपर्यंत नेटानें चालवण्याची प्रवृत्तीच आवश्यक आहे; ती असल्याशिवाय लोकराज्याचा पाया भरतां येणार नाहीं, याची जाणीव फारच थोड्या कार्यकर्त्यांना आहे. कॉंग्रेसमध्यें सत्ताभिलाषी व स्पर्धाशील मंडळींनीं सवते सुभे अनेक ठिकाणीं स्थापन करून ठेवले आहेत. त्यामुळें पक्षाबाहेरील लायक व समंजस व्यक्ती कॉंग्रेसच्या संघटनेंत प्रविष्ट होऊं शकत नाहींत. त्यांच्या दृष्टीनें कॉंग्रेसचे दरवाजे आंतून पक्के लागले गेले आहेत.

दुसरें अवलक्षण वैचारिक अधिष्ठानाचें दौर्बल्य हें होय. राष्ट्रवाद, समाजवाद, कम्युनिझम्, सर्वोदयवाद किंवा उदारधोरणी लोकशाहीवाद यांपैकीं कोणत्या विचारसरणींचा किती अंशांनीं स्वीकार करणें योग्य होय व कोणते अंश टाकावे व कोणते स्वीकारावे, यासंबंधीं तारतम्यदर्शक पद्धति कोणती याविषयीं कॉंग्रेसच्या माणसांना कांहींहि सांगतां येत नाहीं. जो जसा प्रसंग असेल, व ज्या प्रकारची संधि असेल तो प्रसंग व ती संधि साधून जसें समर्थन करतां येईल तसें कॉंग्रेसवाले करतात. त्यासंबंधीं कॉंग्रेसजनांत उपेक्षा किंवा अज्ञानच बहुशः आढळतें. वैचारिक दौर्बल्याचा असा अर्थ आहे. अत्यंत प्रगमनशील विचाराचें नेतृत्व पं. नेहरू यांच्या ठिकाणीं जरी असलें तरी त्यांच्यासारखा प्रगमनशील दृष्टिकोण लाभलेले, अद्ययावत् विचारांच्या संपदेनें समृद्ध असलेले व नव्या व्यापक ध्येयवादानें भारलेले लोक कॉंग्रेसमध्यें क्वचितच् सांपडतात. पं. नेहरूंच्या विचारांची पोपटपंची करणें हें स्वतः कमावलेल्या विचारांचें लक्षण नव्हे ! पं. नेहरूंची प्रगत विचारसरणी आत्मसात् केलेलीं फारच थोडीं माणसें कॉंग्रेसमध्यें निघतील. पं. नेहरूंची विचारसरणी ही उत्स्फूर्त आहे. तिला सुसंगत व तात्त्विक विचारसरणीचा आकार लाभावयाचा आहे. ते स्वतः राजकीय व्यवहाराच्या आखाड्यांत उतरले असल्यामुळें दीर्घचिंतनास आवश्यक तो अवसर त्यांना मिळत नाहीं. कॉंग्रेसची पूर्वीची विचारपरंपरा निधर्मी ( Secular ) राष्ट्रवादाची असली तरी तो निधर्मी राष्ट्रवाद नव्या राष्ट्रीय व जागतिक राजकारणाचे प्रश्न सोडविण्यास समर्थ नाहीं. राष्ट्रवाद हा देशाच्या पूर्वपरंपरेवरील श्रद्धेतून निर्माण झालेला असतो. त्याच्यामध्यें सनातनी आग्रह असतो. पूर्वेतिहासाचा अभिमान हा त्याचा पृष्ठवंश आहे. देशाची भौगोलिक मर्यादा, देशाचा सांस्कृतिक व राजकीय इतिहास, धर्म, विद्यांची व कलांची परंपरा आणि परंपरागत सामाजिक संबंध यांचा समुचित अभिमान आणि यांची पूजा याला राष्ट्रवाद असें म्हणतात. निधर्मी राष्ट्रवादाचा पुरस्कार करणाऱ्या कॉंग्रेसला राष्ट्रवादांतील अनेक घटकांश गौण किंवा त्याज्य ठरवणें भाग पडलें आहे. हिंदुत्ववादी पक्षांचा राष्ट्रवाद हा पूर्वपरंपरेंतील वरीलपैकीं कोणताहि अंश वगळण्यास तयार नसल्यामुळें तो राष्ट्रवाद भरगच्च आहे. कॉंग्रेसच्या राष्ट्रवादावर आधुनिकतेचे संस्कार केले जात नसल्यानें तो पुष्कळच शुद्ध अतएव पोकळ (empty) बनला आहे. कारण, धर्माभिमानाला त्यांत गौण स्थान आहे. जुने सामाजिक संबंध म्हणजे वर्णभेद, जातिभेद व धर्मभेद हे उच्चनीचभावानें, आपपरभावानें व








दूरच्या नात्यानीं भरलेलें असल्यामुळें त्यांत समता व बंधुत्व हें नवें नातें निर्माण होऊं शकत नाहीं. म्हणून जुने सामाजिक संबंध कॉंग्रेसच्या निधर्मी राष्ट्रवादास त्याज्य मानावे लागतात. वर्गहीन समाजरचना स्थापावी आणि स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या मूल्यांनीं पावन झालेली लोकशाही जीवनपद्धति स्वीकारावी असें पुकारणाऱ्या कॉंग्रेसला परंपरागत सामाजिक संबंध बदलण्याचीच आवश्यकता आहे. परंपरागत विद्या व कला ही सांस्कृतिक संपत्ति संघराज्याच्या नव्या आकांक्षाची पूर्ति करण्यास विशेष उपयोगी पडणारी नसल्यामुळें राष्ट्रदेवतेच्या मंदिरांत केवळ पूजेकरतांच तिचा उपयोग आहे. देशाचा सांस्कृतिक व राजकीय इतिहास हा प्रगति व अवनति या दोन्ही प्रकारच्या घटनांनीं भरला असल्यामुळें त्याच्याबद्दलचा अभिमान मर्यादित प्रमाणातच ठेवणें आवश्यक, असें मानावें लागतें. म्हणून राष्ट्रवादी श्रद्धेचा एकच घटक निर्विवाद स्वरूपांत शिल्लक राहतो. तो म्हणजे देशाची भौगोलिक मर्यादा. या देशाच्या भौगोलिक मर्यादेची पूजा देशमर्यादेला ' एको देवः ' म्ह० संपूर्ण महादैवत मानून करणें, हें राष्ट्रवादाचें व्यवच्छेदक लक्षण बनूं शकतें. परंतु पंचशीलाचा पुरस्कार करणाऱ्या व जागतिक सहजीवनाचा सिद्धान्त जगाच्या राजकारणांत स्थापन करण्यास बद्धपरिकर झालेल्या कॉंग्रेसी नेतृत्वाशीं हें लक्षण केव्हांहि विसंगतच ठरेल. तात्पर्य, निधर्मी राष्ट्रवाद हा वैचारिक दृष्ट्या शिथिल सिद्धान्त ठरत आहे. कॉंग्रेसला जी राजकीय व सामाजिक क्रांति या देशांत घडवून आणावयाची आहे व जिचा संदेश साऱ्या जगाला पोंचवावयाचा आहे, तिचें वैचारिक अधिष्ठान म्हणून निधर्मी राष्ट्रवाद अगदीं लेचापेचा ठरतो. म्हणून कॉंग्रेसचें वैचारिक अधिष्ठानाचें दौर्बल्य हा मोठा चिंतेचा विषय बनतो. त्यामुळेंच सकस विचारांनीं संपन्न अशा कार्यकर्त्यांची वाण भासूं लागते. विधायक कार्य करणाऱ्यांचीच गरज आहे अशा तऱ्हेची मागणी मात्र उच्चरवांनीं केली जाते !

प्रत्यक्ष कार्याला विचारच प्रवृत्त करूं शकतो. विचार जितका महत्त्वाचा, तितकें कार्य महत्त्वाचें. परंतु विचार म्हणजे एक विशिष्ट सांप्रदायिक विचारसरणी नव्हे. जगाच्या व राष्ट्राच्या जीवनांतील जे कठिण प्रश्न राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक स्वरूपाचे म्हणून पुढें येत आहेत, त्यांचें निदान ज्यांच्या योगानें करतां येतें व ज्यांच्या योगानें ते प्रश्न सोडविण्यास दृष्टि लाभते अशा विविध विचारसरणींची समृद्धि असा येथें विचार या शब्दानें अर्थ व्यक्त करावयाचा आहे. समाजवाद, कम्युनिझम्, फासिझम्, लोकशाही तत्त्वज्ञान इत्यादि वादांत हे कठीण प्रश्न चर्चिलेले असतात. या वादांच्या साधकबाधक बाजूंचें ज्ञान म्हणजेच हा विचार होय. आधुनिक सामाजिक शास्त्रें व इतिहासविषयक सिद्धान्त अशा प्रश्नांचें निदान करण्यास आवश्यक ती दृष्टि देतात. म्हणून त्यांचाहि अभ्यास विचाराचा महत्त्वाचा भाग बनतो.

कॉंग्रेसच्या दौर्बल्याचें तिसरें अवलक्षण तिच्या संघटनातंत्रांत उघडकीस येतें. संघटनेचें उघड दिसणारें किंवा बाह्य स्वरूप लोकशाही पद्धतीचें आहे, परंतु प्रत्यक्ष वर्तन अनेक ठिकाणीं हुकूमशाहीच्या वळणावर जातें. मुख्य अधिकारपदस्थ व्यक्ती वा सत्ताधारी मंत्री जो कांहीं निर्णय घेतात तोच मुकाट्यानें स्वतःचा मतभेद दाबून बाकीचे सभासद बाह्यात्कारी रीतीनें मान्य करतात. अशा स्थितींत मतभेद असलेला माणूस गप्प तरी बसतो व मतभेद व्यक्त करणारा बाजूला फेंकला जातो. दुसरें असें कीं, कॉंग्रेसची राजकीय संघटना व मंत्र्यांचा व विधिमंडळांतील पक्षाचा कारभार यांच्यांमध्यें निगडित संबंध रहात नाहीं. कॉंग्रेससंघटना ही अनेक वेळां उपेक्षितस्थितींतच पडून राहते.

चौथें महत्त्वाचें अवलक्षण म्हणजे सर्व प्रांतांवर म्हणजे अखिल भारतावर अपल्या कर्तृत्वानें व विचारसरणीनें प्रभाव टाकील, प्रांतमर्यादांच्या संकुचित भावना ज्यांच्या बाबतींत आड येणार नाहींत अशा लोकनेत्यांची प्रभावळ आतां कॉंग्रेसमध्यें दिसेनाशी झाली आहे. कॉंग्रेस ही एका खांबावरची द्वारका बनली आहे. पं. नेहरूंचें वैयक्तिक नेतृत्व म्हणजेच हा एक खांब होय. त्यांच्याशिवाय सगळ्या भारताला स्वतेजानें आकर्षित करील अशी एकहि नवी व्यक्ति कॉंग्रेसमध्यें उदयास येत असलेली दिसत नाहीं. डॉ. राजेंद्रप्रसादांसारखे एकदोन वृद्ध नेते सोडल्यास बाकी सर्व फारच ठेंगणे दिसतात. त्यामुळें पुढें सांगितलेलें अवलक्षण प्रबळ होण्याचा धोका वाढूं लागला आहे.

हें पांचवें व अखेरचें अवलक्षण होय. प्रांतवाद, जातिवाद व त्यास कारणीभूत होणारी प्रतिगामी विचार-








सरणी, असें त्याचें समुचित स्वरूप होय. स्थानिकतेचा आत्यन्तिक अभिमान हें राष्ट्रवादाचें सर्वसाधारण मूळ रूप होय. या स्थानिकतेच्या आत्यन्तिक अभिमानाचेंच दुसरें प्रत्यंतर प्रांतवाद होय. प्रांतवादाचें व्यवच्छेदक लक्षण प्रादेशिक भाषा होत. युरोपमध्यें २०० वर्षांपूर्वी भिन्न भिन्न राष्ट्रें जन्मलीं व त्याबरोबर राष्ट्रवाद निर्माण झाला. युरोपांतील बहुतेक राष्ट्रें, स्वित्झर्लंडचें उदाहरण सोडल्यास, भाषाभेदांमुळेंच उत्पन्न झालीं आहेत. वस्तुतः युरोपची अधिष्ठानभूत संस्कृति खूपच एकजिनसी आहे. ती म्हणजे खिश्चन संस्कृति होय. ही खिश्चन संस्कृति हिंदुधर्मापेक्षां सामाजिक दृष्ट्या पुष्कळच अधिक एकजीव आहे. इतकें असूनहि तेथें भाषिक राष्ट्रें ब्रिटन, फ्रान्स, इटली, स्पेन, जर्मनी, इत्यादि जन्मलीं. एक भाषा ही एकत्रित बांधणारी आणि अन्य भाषिकांपासून भेद पाडणारी जबरदस्त शक्ति आहे. ती राष्ट्र उत्पन्न करते. कदाचित् असेंहि आणखी म्हणतां येतें कीं, २०० वर्षांपूर्वी वेगवान् अशा यांत्रिक दळणवळणसाधनांचा अभाव असल्यामुळें भाषिक भेद युरोपांत प्रबळ झाला. हिंदुस्थानांत हा भाषिक भेद राष्ट्रभेदास कारण होऊं शकला नाहीं. याचें कारण आधुनिक यांत्रिक दळणवळण होय. असेंहि म्हणतां येतें कीं, येथील एकराष्ट्रीयत्वाची पार्श्वभूमि ब्रिटिशांची अखिलभारतीय केंद्रित राज्यसत्ता ही होय. ती नसती तर विकासक्रमांत भाषिक राष्ट्रेंच उत्पन्न होणें अधिक संभवनीय होतें. तें कांहीं जरी असलें तरी कॉंग्रेसच्या प्रांतिक संघटनांच्यामध्यें अलीकडे जें प्रांतिक अभिमानाचें वारें शिरलेलें दिसतें, त्यावरून ही एकराष्ट्रीयता वरपांगी व शिथिल आहे असेंच म्हणणें भाग पडतें. भाषावर प्रांतरचनेकरितां कांहीं ठिकाणीं घातपाती चळवळींपर्यंत मजल गेली. या बाबतींच नुकताच आलेला एक अनुभव तर मोठाच उद्बोधक आहे. एखादा तालुका किंवा जिल्हा स्वतःच्या भाषिक प्रदेशांत समाविष्ट व्हावा कीं नाहीं याबद्दल आकाश-पाताळ एक करणारे, लढ्याची भाषा बोलणारे व निर्वाणीचा आदेश देणारे अनेक प्रांताध्यक्ष, दिल्लीस एकत्र जमले असतां, 'मुंबई महाराष्ट्रांत येऊं नये' याकरितां एकजुटीनें महाराष्ट्रास विरोध करतात! एकात्मक भारतीयत्वाच्या जाणीवेचें हें भयंकर विडंबन आहे! मुंबईतील बिन-मराठी जमातींचे प्रतिनिधि राज्यपुनर्रचना समितीपुढें "महाराष्ट्रांत मुंबई जाणें धोक्याचें आहे!" असें निवेदन देतात. ह्या गोष्टीनें तर, एकराष्ट्रीयत्वाची भावना किती निर्बळ आहे, व एकराष्ट्रीयत्वाला केवढे मोठे धोके आहेत, याचें प्रत्यंतर मिळतें. महाराष्ट्राच्यासंबंधीं व्यक्त झालेला दुजाभाव या देशांत एकराष्ट्रीयत्वाची भावना किती उथळ व कच्ची आहे, याची साक्ष देतो. हा प्रांतवाद कॉंग्रेससारख्या भारताच्या वरिष्ठ राष्ट्रीय संस्थेंत जर इतका बोकाळलेला दिसतो तर भारताच्या राष्ट्रीय जीवनांत त्याचीं मुळें किती खोल गेलेलीं असतील याची कल्पना न करणेंच बरें! भाषिक राज्यें निर्माण झाल्यावर हें भेदांचें भूत आपलें डोकें अधिकच वर काढण्याचाहि संभव आहे, हें नाकारून चालणार नाहीं. देशाच्या सुरक्षिततेला हा एक मोठाच धोका आहे. संकुचित स्थानिक अभिमानाची आत्यन्तिकता व व्यापक विचारसरणीचा अभाव हें त्याचें मुख्य कारण होय. राष्ट्रवाद हा त्यावर इलाज होऊं शकत नाहीं. कारण तोहि स्थानिक आत्यन्तिक अभिमानाचाच एक पर्याय आहे; आणि कॉंग्रेसच्या नव्या राष्ट्रीय व जागतिक राजकारणाचें योग्य अधिष्ठान म्हणून तो बनूं शकत नाहीं. द्विभाषिक किंवा अनेकभाषिक प्रांतिक राज्यांची रचना करणें एका दृष्टीनें राष्ट्रैक्याचें दृढीकरण करण्याचे दृष्टीनें अधिक हितावह झालें असतें. तात्पर्य, राज्यपुनर्रचना समितीचा अहवालच कॉंग्रेसनें अजूनहि बाद करावा.

जातिवाद हा दोन तऱ्हेच्या स्वरूपांत भारतांत ठाण देऊन बसला आहे. हिंदु, मुसलमान, खिश्चन इत्यादि धार्मिक जमातींचें वैमनस्य हा त्याचा पहिला प्रकार होय. त्यामुळेंच हिंदुस्थानचे दोन तुकडे झाले. दुसरा प्रकार म्हणजे हिंदूंची जातिसंस्था डबघाईस आल्यानें तिच्यांतून उत्पन्न झालेलीं जमातींचीं वैरें होत. उत्तरेतला किंवा दक्षिणेतला कोणताहि प्रांत घेतला तरी त्यांतील कॉंग्रेससंस्थेमध्यें कांहीं विशिष्ट जातींचें प्रस्थ वाढलेलें दिसतें. उत्तर प्रदेश, राजस्थान यांसारखे कांहीं प्रदेश यास अपवाद होत. या जातिवादाच्या शापांतून मुक्त होण्यास महत्त्वाचे दोन उपाय अमलांत आणण्याची गरज आहे. सामाजिक सुधारणांचा कार्यक्रम नेटानें अमलांत आणणाऱ्या कार्यकर्त्यांचा वर्ग तयार करणें, हा पहिला उपाय होय. सामाजिक सुधारणांचा कार्यक्रम अमलांत आणण्याच्या कसोटीस उतरणाऱ्या व्यक्तीच कॉंग्रेसच्या








पदधारी व राज्यकारभारांतील महत्त्वाच्या स्थानास योग्य ठरविणें जरूर आहे. ही सामाजिक सुधारणेची कसोटी नोकरशाहींतील उच्चपदस्थ व्यक्तींनाहि लागूं केली पाहिजे. दुसरा उपाय म्हणजे मतदार-वर्गास लोकशाही जीवनपद्धतीचें शिक्षण देऊन त्याच्या व्यवहार्य कसोट्या ठरविणें हें होय. प्रतिगामी विचार-सरणीचे लोक मोठ्या प्रमाणांत कॉंग्रेसमध्यें दबा धरून बसलेले दिसतात. पुराणमतवादी विचारप्रवृत्ति ही त्यांची खूण होय. " आव जाव घर तुमारा " असें कॉंग्रेसचें आजपर्यंतचें धोरण होतें व तें एका अर्थी स्वातंत्र्यपूर्वकालाच्या मर्यादेपुरतें ठीकहि होतें. परंतु मौलिक समाजसुधारणेचा कार्यक्रम आणि लोकशाही व समाजवादी क्रांतीचा आदर्श या गोष्टी निश्चित केल्यानंतरहि अशा लोकांस कॉंग्रेसमध्यें महत्त्वाचें स्थान मिळतें, ही गोष्ट मोठीच विसंगति निर्माण करते व संघटनेस कमकुवत करते.

## अवलक्षणांतून मुक्ति

ह्या पांच अवनतींच्या अवलक्षणांपासून मुक्त हो-ण्याची शक्ति कॉंग्रेसमध्यें आहे. कारण तिचें नेतृत्व गतिशील व सावध आहे, त्या नेतृत्वामध्यें उच्च आदर्शांची प्रेरणा भरपूर आहे, नवे नवे प्रयोग कर-ण्याचें धाडस आहे, व धोका पत्करूनहि महत्वाचे निर्णय करण्याची धमक आहे. दुसरें असें कीं, कॉंग्रेसची संघटना देशव्यापी असल्यामुळें व एका विशाल संघ-राज्याचा भार तिनें खांद्यावर घेतला असल्यामुळें विचार-वंत व कर्तबगार माणसांचा भरणा करणें कॉंग्रेसला सहज शक्य आहे. नव्या दमाचीं व नव्या दृष्टीचीं माणसें कॉंग्रेसमध्यें येऊन दाखल होणें ही गोष्ट साध-ण्याचीं साधनें कॉंग्रेसला उपलब्ध होऊं शकतात. सध्याचें निवडणुकीचें यंत्र हें रूप बदलावयाचें तर सरकारी, निमसरकारी, बिनसरकारी, सार्वजनिक व खाजगी संस्थांच्यामध्यें राजकीय, सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक कार्यें स्वयंस्फूर्तीनें करणारे कार्यकर्ते आणि समाजसुधारणेची व लोकशिक्षणाची चळवळ चालविणारे समाजसेवक असतात, त्यांना निवडण्याचें काम सतत करीत राहून त्यांचा भरणा कॉंग्रेसमध्यें सतत करावा लागेल. त्याकरितां त्या त्या व्यक्तींचा कॉंग्रेसशीं पूर्वी काय संबंध होता, या गोष्टीची पर्वा करतां कामा नये. 'कॉंग्रेसमध्यें नवें रक्त आलें पाहिजे, तें येत नाहीं'– या उद्गारांना त्याशिवाय महत्त्व राहत नाहीं. वैचारिक दौर्बल्य घाल-वावयाचें तर लोकशाहीचें तत्त्वज्ञान, लोकशाहीची जीवनपद्धति आणि वैज्ञानिक दृष्टिकोण या गोष्टी शिकविणारीं कार्यकर्त्यांचीं अभ्यासमंडळें सर्वत्र व सतत चालविणें आवश्यक आहे. आधुनिक सामाजिक शास्त्रांचें व विविध ध्येयवादांचें संकलनात्मक ज्ञान देणारा अभ्यासक्रम या अभ्यासमंडळांकरितां तयार करणें युक्त होईल. अभ्यासमंडळांत तयार झालेल्या माणसांकडे एक एक गांव सामाजिक सुधारणा व लोकशाहि जीवनपद्धति यांच्या प्रयोगार्थ सोंपवून विचारांना कृतीचें रूप दिलें पाहिजे. अशा रीतीनें कॉंग्रेसमध्यें वैचारिक क्रांति झाल्याशिवाय देशांत वैचारिक क्रांति होणें कठीण आहे. नवे विचारवंत व व्यापक दृष्टीचे कार्यकर्ते सत्तास्पर्धेच्या भावनेंतून मुक्त झालेले कॉंग्रेसमध्यें आले, तरच कॉंग्रेसमधील सवता-सुभा स्थापन केलेल्या व्यक्तींची अप्रत्यक्ष रीत्या चाल-लेली हुकूमशाही मावळेल आणि राज्यकारभारावर कॉंग्रेसच्या संघटनेचा दाब वाढेल. तसा दाब न वाढल्यास नोकरशाही प्रबळ होण्याचा धोका आहे. प्रांतवाद व जातिवाद यांचें प्रस्थ कमी होण्यास पंचवार्षिक आर्थिक नियोजनांची देशव्यापी व समतोल प्रगति हीच उपयोगी पडेल. प्रांतांचे हितसंबंध हे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीत्या देशाच्या सर्वसाधारण हितसंबंधांमध्यें संपूर्णपणें गुंतलेले आहेत असा अनुभव जनतेला येऊं लागला आणि आर्थिक स्थिति व शैक्षणिक प्रगति यांचा जीवनांत प्रत्यक्ष प्रत्यय जनतेला येऊं लागला कीं, प्रांतवादाची व जाति-वादाची संकुचित व फुटीर भावना अस्ताला जाईल.

ब्रिटिशसत्तेचा अस्त झाल्यानंतरच्या या वर्तमान काळांत पाकिस्तानमध्यें जसा गोंधळ माजला तसा भारतांत माजला नाहीं. याचें श्रेय मुख्यतः कॉंग्रेसकडे जातें. संस्थानिक-राज्यांचें विसर्जन, सार्वत्रिक मतदा-नाच्या हक्कावर आधारलेलें संघराज्याचें संविधान, पंच-वार्षिक योजनांची प्रगति, अन्नधान्याच्या तुटीच्या प्रश्नाचें निवारण आणि सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे जाग-तिक राजकारणांतील भारताचें नेतृपद – या गोष्टी त्वरित गतीनें थोड्या अवधींत भारतास साधल्या याचें मुख्य श्रेय कॉंग्रेसच्या नेतृत्वाकडेच जातें. कॉंग्रेसच्या बळकटीवर व प्रगतीवर या देशाची शांतता व प्रगति दीर्घकालपर्यंत अवलंबून राहणार आहे. म्हणून या देशांतील प्रत्येक नागरिकानें कॉंग्रेसचें यश व शुभच चिंतिलें पाहिजे.

‘ बनगरवाडी’चें समीक्षण : प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर

# कथा-वाङ्मयांतील एक उच्चांक

उत्तम कलाकृतीच्या सौंदर्यप्रतीतीला दुसऱ्या कशा-चीहि जरूरी नसते.

हें जर खरें तर मग अभिप्रायाची तरी गरज काय ? ‘ **बनगरवाडी** ’ या पुस्तकाचें नांव व लेखक सांगून हें पुस्तक सर्वांनी वाचावें अशी शिफारस केली म्हणजे पुरें.

एक वर्ष झालें. गतवर्षीचा ‘ **मौजे**’चा दिवाळी-अंक संपादकांनीं मजकडे पाठविला. त्यांचा हेतु बहुधा त्या अंकांत जो महाराष्ट्रसंस्कृतीविषयीं ऊहापोह केलेला होता तो माझ्या नजरेस आणून त्यावर मी कांहीं लिहावें असा असावा. मी तें सर्व लिखाण वाचलें पण हातांत लेखणी घ्यावी अशी वासना झाली नाहीं. पण त्याच अंकांतील ‘ **बनगरवाडी**’नें मात्र माझें लक्ष वेधलें. सामान्यतः मी लघुकथा ओलांडून पुढें सटकणारा वाचक. पण या गोष्टीवर माझी नजर खिळली खरी. याचें कारण ग्रामीण जीवनाबद्दलची मला असलेली व पन्नास वर्षें मोठ्या शहरांत राहूनहि न गेलेली माझी ओढ ! तीस वर्षांमागें माझ्याहि मनांत असेंच कांहींतरीं आपल्या गांवासंबंधानें लिहावें असें आलें होतें. पण तो विचार तेथेंच थबकला. याचें एक मुख्य कारण **राजवाडे** आणि **टिळक** हे जे आदर्श मजपुढें होते त्यांच्या अनुकरणांत ललितवाङ्मय बसत नव्हतें हेंच होय. आतां मनांतील त्या अंकुरावर एवढ्या दरडी कोसळल्या आहेत कीं तो अंकुर कोठें जिवंत असेल असाहि संभव नाहीं. पण मनांतील सुप्त आवड ‘ **बनगरवाडी**’नें जागृत केली.

गोष्ट मला आवडली तेव्हां लेखकांना नाहीं तर प्रकाशकांना तसें कळविणें हें माझें कर्तव्य होतें. मी माझी पसंती माझ्या सहकारी डॉ. इरावतीबाई कर्वे यांच्याजवळ चहाच्या टेबलावर बोललों सुद्धां. त्यांचेंहि अगदीं तसेंच मत होतें व त्यांच्या मनांत आल्याबरो-बर लिहून टाकण्याच्या प्रवृत्तीप्रमाणें त्यांनीं लेखकाला कार्ड लिहून आधींच टाकलेंहि होतें ! समाजांत कोठलीहि चांगली गोष्ट घडली तर तिची प्रशंसा करून ती दुसऱ्यांच्या नजरेला आणणें हें प्रत्येक नागरिकाचें वस्तुतः एक कर्तव्यच म्हटलें पाहिजे. एरवीं ती गोष्ट इतरांना कशी माहीत होणार व तिच्या कार्याला आपण योग्य मार्गावर आहों हें तरी कसें कळणार ?

गतवर्षी राहून गेलेलें हें कर्तव्य आतां ‘**बनगरवाडी**’ पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्यामुळें पुरें करण्याची संधि मला ‘ नवभारता’च्या संपादकांच्या विनंतीनें पुनः प्राप्त झाली आहे. ज्या अर्थी ही छोटी कथा पुनर्मुद्रित करावी असें ‘ **मौज**’कारांना वाटलें त्याअर्थी त्यांच्याकडे कथेबद्दलची पसंती अनेकांकडून लिहून आली असेल असा साहजिकच तर्क होतो. या छोट्या पुस्तिकेला लेखक किंवा प्रकाशक यांपैकीं कोणाचीहि प्रस्तावना नाहीं. त्यामुळें याबाबत त्यांकडून कांहीं कळत नाहीं. तरी मराठी वाचकांची पसंती तिला लाभलेली असावी असें म्हणण्यास हरकत वाटत नाहीं.

लेखक **व्यंकटेश माडगूळकर** यांचें नांव, मला वाटतें मी ‘ **अभिरुची**’च्या अंकांत प्रथम वाचलें. त्याला अजून पुरें दशकहि झालेलें नाहीं. ‘अभिरुची’-तीलहि सर्वच गोष्टी मी वाचल्या नसाव्या. तींत प्रसिद्ध झालेल्या कांहीं लेखकांच्या मला गैर वाटणाऱ्या गोष्टीं-बद्दल मी माझी नापसंती संपादकांना कळविली होती. कथालेखकालाहि नागरिकाचीं कर्तव्यें असतात व त्यानें आपला प्रतिभाविलास नटविण्यासाठीं समाजाला वाईट वळण लागण्याचा जेथें दूरचाहि संबंध असेल असला वाग्विलास अवश्य टाळावा असें माझें मत आहे. माझ्या नापसंतीच्या गोष्टी माडगूळकरांच्या नसल्या तरी त्यांच्या त्यावेळच्या लघुकथा मला आवडल्याचेंहि मला स्मरत नाहीं. आतां त्यांच्या त्या माणदेशांतील गांवाकडल्या गोष्टी पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्याचें कळतें. यावरूनहि त्यांच्या लेखनानें आपला असा एक वाचकवर्ग निर्माण केला आहे असें ठरतें. पण त्यांच्या प्रस्तुत ‘**बनगरवाडी**’नें **मराठी कथावाङ्मयांत एक उच्चांक स्थापन** केला आहे असें म्हणावयास मला कसलीच शंका वाटत नाहीं.

मराठी लघुकथांचा जन्म शहरी लेखकांच्या शहरी समाजांतच आणि शहरी वाचकांसाठींच बहुधा झाला. महाराष्ट्रांतील सामाजिक सुधारणेची लाट व कथा-

‘ **बनगरवाडी** ’ – लेखक : **व्यंकटेश माडगूळकर**. मौज प्रकाशन लि., खटाववाडी, मुंबई ४, १९५५ पानें १२७, किं. २॥ रु.







वाङ्मयाची वाढ हीं समकालीन व समांतर आहेत. हिंदुस्थानांत स्त्रीशिक्षणाच्या व स्वातंत्र्याच्या सामाजिक चळवळीचा जोरहि महाराष्ट्रांतच दृग्गोचर झाला. जरी बंगाल्यांत ब्राह्मो-समाजामुळें स्त्रीशिक्षणास आधीं आरंभ झाला असला तरी तिकडे फुले, पंडिता रमाबाई, रानडे, पंडित, आगरकर, कर्वे, हरिभाऊ आपटे यांसारखी आपापल्या क्षेत्रांत अव्वल दर्जाचें कार्य करणारीं निःस्वार्थी मंडळी थोडीच पुढें आली. त्यामुळें लोकमान्यांसारख्या पुढाऱ्याच्या सर्वंकष राजकीय ऐतिहासिक चळवळीस न जुमानतां येथें सामाजिक सुधारणेचा गाडा सर्वांत पुढें गेला. इतका कीं आतां त्यांतील दुष्परिणामांची निराकृति करण्याचा विचार सुरू करावा लागला आहे.

हे दुष्परिणाम बहुधा स्त्रीस्वातंत्र्य, लैंगिकस्वातंत्र्य, कुटुंबव्यवस्था, जातिविचार आणि व्यक्तिस्वातंत्र्य इत्यादि प्रश्नांशीं निगडित आहेत. आरंभीं तरी आमची सामाजिक सुधारणा, त्या वेळीं तो शब्द नव्हता तरी, मानवतेवर व शास्त्रीय विचारसरणीवर अधिष्ठित होती. मिल्, स्पेन्सर आमच्या सुधारकांचे आदर्श होते व त्यांच्या ग्रंथांचीं मराठींत भाषांतरेंहि झालीं. पण असें असलें तरी आजहि आपल्या समाजांत स्त्रीशिक्षण म्हणजे अलंकारभूषणांपैकींच एक प्रकार अशी समजूत नांवाजलेल्या प्रोफेसरांच्या मनांतहि वास करीत असलेली दिसते. बी. ए. बायको कशासाठीं पाहिजे ? तर तिच्या कॉलेजांतील राहाणीमुळें ( – बौद्धिक शिक्षणामुळें नव्हे – ) तिची उपभोग्य मनोज्ञता वृद्धि पावलेली असते म्हणून. पुष्कळ आईबापहि मुलींची विवाहक्षमता वाढावी म्हणूनच तिला शिक्षण देत असतात. आर्थिक असमर्थता, कुरूपता, अनाकर्षता आदि अडथळे कमी करण्याचा एक उपाय म्हणून शिक्षणाचा मार्ग अवलंबिण्यांत येत असतो हें उघड होय.

मराठी लघुकथा-वाङ्मयाची वाढ सामाजिक सुधारणेच्या अनुरोधानें झालेली दृष्टीस पडते. **'मासिक-' मनोरंजना'**च्या व '**करमणुकी**'च्या पहिल्या वर्षांच्या अंकांपासून पाहिलें तर या गोष्टीची खात्री पटेल. यांत मुख्यतः शहरी व सुशिक्षित जीवनाचा आविष्कार असे. पाश्चात्त्यांच्या सहवासानें, अनुकरणेच्छेनें व व इंग्रजी वाङ्मयाच्या अभ्यासामुळें या वाङ्मयप्रकाराचा प्रारंभ झाला. ज्या इंग्रजीशिक्षित प्रतिष्ठित माणसांना साहेबासारखें आपलेंहि घर असावें असें वाटूं लागलें होतें, त्यांच्या मनोविनोदनार्थ हा नूतन कथाविष्कार सुरू झाला. त्यांत इंग्रज अधिकाऱ्यांच्या अहंगंडाचें नकली चित्र देशी अधिकाऱ्यांच्या संसारांत प्रतिबिंबित करण्याचा मार्ग स्वीकारलेला होता. ग्राहक-वाचकांकडे बघूनच हा वाङ्मयसंसार वाढला.

अशा रीतीनें नऊदशांश कथा शहरी सुशिक्षितांच्या जीवनासंबंधीं लिहिल्या गेल्या असल्या, तरी अगदीं आरंभापासून महाराष्ट्राच्या ग्रामीण म्हणजेच शेंकडा नव्वद लोकसंख्येच्या ज्वलंत सामाजिक प्रश्नांकडेहि कांहींचें लक्ष वेधलेलें दिसतें. **धनुर्धारींचा 'पिराजी पाटील'** व **आपट्यांची 'काळ तर मोठा कठीण आला'** ही कहाणी या गोष्टीची साक्ष पुरवितात. पावसाच्या अभावामुळें पडणारे दुष्काळ व त्यामुळें होणारी ग्रामीण जनतेची वाताहत हा महाराष्ट्राच्या कांहीं भागांतील कायमचा सामाजिक विषय आहे. **माडगूळकरांनीं** हा विषय हाताळण्यानें एका मूलभूत प्रश्नाकडे सुशिक्षित मराठ्यांचें लक्ष, हृदयाला हात घालून, वेधलें आहे व असें करतांना अवश्य ती लोकभाषा लीलेनें राबविली आहे. साहित्यसृष्टींतील हा मोठाच विक्रम होय.

माडगूळकरांचें विश्व प्रादेशिक आहे. माजी औंध-संस्थानांतील आटपाडी हा माण-नदीच्या परिसरांतील दुष्काळी तालुका त्यांच्या मनांत कायम घर करून बसलेला आहे. त्याच पार्श्वभूमीवर, त्याच सामाजिक वातावरणांत, तेथीलच लोकभाषेच्या प्रवाहांत ते डुंबत असतात. आजच्या बहुतेक शहरी सुशिक्षितांच्या मनावर कोणताच सांस्कृतिक ठसा मुळांतच उमटलेला नसतो. बकाली पार्श्वभूमीवर त्यांची चित्ररचना चालू असते. म्हणजे त्या त्या जीवनांतील खोली त्यांनीं स्वतः अनुभवलेली नसते, तर ते एक दृश्य म्हणून त्या त्या गोष्टीकडे पहात असतात. याउलट, माडगूळ-करांचें विश्व मर्यादित – कोणी म्हणेल अतिमर्यादित – असेल. पण स्वयंपूर्ण अनुभूतीला त्याचीच आवश्यकता आहे. आणि त्यांतूनच चिरंजीव साहित्य निर्माण होण्याची शक्यता असते. हार्डीच्या **'वेसेक्स टेल्स'** अशाच पार्श्वभूमीवर रंगविलेल्या आहेत व म्हणूनच त्या वाङ्मयावर आपला कायमचा ठसा उठवून गेल्या आहेत. प्रथितयश नोबेल पारितोषिक मिळविणाऱ्या लेखकांकडे पाहिलें तर त्यांतीलहि बरेच अशा








मर्यादित, प्रादेशिक जीवनावर आपुलकीनें लिहितांना आढळतात. नॉर्वेजिअन लेखक **कॅन्यूट हॅम्सन** याचें ' ग्रोथ ऑफ दि सॉईल ' व पोलिश लेखक **लॅडिस्लास रेमॉंत** याची चारी ऋतूंतील शेतकरी जीवन चार भागांत रंगविणारी ' पेझन्ट्स ' ही कादंबरी ह्या अशा मर्यादित चित्रफलकावर हळुवार हातानें रंगविलेल्या दीर्घकथा आहेत. माडगूळकर हे कथाकादंबऱ्या वाचून त्यांचें अनुकरण म्हणून लिहावयास बसलेले लेखक नसून स्वतः जगलेलें जीवन प्रतिबिंबित करणारे लेखक दिसतात. यामुळें त्यांचें लेखन हृदयाची पकड चटकन् घेऊं शकतें. प्रादेशिक भाषेंत त्यांचा कथाविष्कार नटलेला असल्यामुळें याहि बाबतींत ते इतर वाङ्मयावर अवलंबून नाहींत. ' **बनगरवाडी**'मध्यें महाराष्ट्रभाषासुंदरी रानफुलांनी शृंगारलेल्या खेडवळ मुलीच्या स्वरूपांत उभी असून तिचें स्वरूप मनांत ठसण्यासारखें उमटलें आहे.

' **बनगरवाडी** ' वैशिष्ट्यपूर्ण वाटण्याचें कारण असें कीं तींतील विषय सर्वस्वीं अगदीं मागासलेल्या धनगरी संस्कृतीच्या लोकांबद्दल आहे. मानवेतिहासविकासांत पशुपालन व शिकार हीं शेतीच्या आधींची. त्यामुळें संस्कृतीच्या प्राथमिक स्वरूपाचें ज्ञान या कथेवरून चांगलें होतें. आज मनुष्य कितीहि सुधारलेला असला तरी त्याच्या रक्तांतील आठवणींत आपल्या पूर्वजांच्या मानवेतिहासांतील या अगदीं जुन्या आयुष्याबद्दल सुप्त आपुलकी असतेच व अशी गोष्ट वाचली म्हणजे कांहींतरी विसरलेलें पुनः आठवल्याचा आनंद त्याला होतो. महाराष्ट्राला महाराष्ट्र हें नांव मिळण्यापूर्वीं येथें दंडकारण्य होतें तेव्हां येथील लोक प्रामुख्यानें असल्या धनगर-संस्कृतीचे असावे. अजूनहि हा पट्टा महाराष्ट्राच्या मध्यभागीं उभा पसरलेला असून त्याच्या दक्षिणेकडील कर्नाटकांत तो आजहि प्रामुख्यानें जिवंत आहे. काळाच्या ओघांत मागें पडलेला हा मेंढपाळ वर्ग महाराष्ट्र-संस्कृतीचें एक मूळ अंग आहे. या अंगाच्या कदाचित् आतां मरूं घातलेल्या शेवटच्या पिढीचा हा इतिहास वर्णनरूपानें माडगूळकरांनीं संगृहीत केला आहे. तो प्रतिनिधिभूत वठल्यामुळें वाङ्मयांत चिरस्थायी व्हावा अशी कल्पना आहे. संपूर्ण महाराष्ट्रसंस्कृतीचें यथातथ्य दर्शन व्हावयाचें तर '**बनगरवाडी**'प्रमाणें प्रत्येक तालुक्याचें किंवा त्याहूनहि छोट्या भूभागाचें असें स्वतंत्र चित्र रेखाटलें गेलें पाहिजे. संयुक्त महाराष्ट्राचे सुमारे तीनशें तालुके होतील. माडगूळकरांसारखे स्थानिक जनतेशीं भाषेपासून समरस झालेले स्वप्रदेशाभिमानी लेखक पुढें येतील तर महाराष्ट्रेतिहासाला जिवंत केल्याचें श्रेय त्यांना मिळेल. कारण लोकांचा इतिहास, समाजांतील अगदीं खालच्या थरांचा चित्रेतिहास, हाच हिंदी जनतेचा खराखुरा इतिहास होय. राजवंशांचा इतिहास हा जनतेवर चरणाऱ्यांचा इतिहास, तो खरा इतिहास नव्हे. मात्र ही गोष्ट कोणी लेखकानें माडगूळकरांचें अनुकरण, नक्कल करून साध्य होण्यासारखी नाहीं. त्याला मूळचाच पिंड त्यांच्यासारखा स्वाभाविकपणेंच तयार झालेला असला पाहिजे. जातिवंत स्वदेशाभिमान्यांचें हें काम आहे. शिक्षणाचा येथें कांहींहि उपयोग नाहीं व हें काम येरागबाळांचें नाहीं.

माडगूळकर हे अगदीं आजच्या पिढीचीच गोष्ट सांगत आहेत. त्यांच्या वडिलांनीं किंवा आजोबांनीं असें चित्र रंगविलें असतें तर तें बरेंच वेगळें झालें असतें हें उघड आहे. पण त्या पिढ्यांना असें चित्र रंगविण्याची कल्पना सुद्धां येणें शक्य नव्हतें. माडगूळकरांना सुद्धा ती कल्पना आली याचें कारण ते ज्यांनीं थट्टा केलेल्या औंधकर पंतांच्या राज्यांत वाढले हेंच होय. सत्तर खेड्यांच्या छोट्या विलग राज्यांत **भवानरावांनीं** खरोखरींच ज्ञानदीप प्रज्वलित केला असें म्हणण्यांत बिलकुल अतिशयोक्ति नाहीं. आपल्या प्रजेची शारीरिक, बौद्धिक व सांस्कृतिक उंची वाढावी यासाठीं त्यांनीं आपल्या ग्रामीण राजधानींत एक केंद्रच स्थापले होतें. देशी संस्थानिकांवर त्यांचे दोष काढून टीका करणें सोपें आहे. पण जुन्या भारताच्या या अवशेषांनीं पाश्चात्त्य प्रलयांत संस्कृतीचीं मुळें जगविण्याचें सत्कार्य बऱ्याच मोठ्या प्रमाणावर केलें हें इतिहासकारास विसरून चालणार नाहीं. प्रस्तुत छोट्या कथेंतील पंधराव्या प्रकरणांत औंधकरांचें छोटें चित्र रेखाटून माडगूळकरांनीं या गोष्टीची कबुलीच दिली आहे. ते जुने राजे गेले आणि त्यांच्या जागीं ठिकठिकाणीं आजच्या महाराष्ट्रांत दसपट श्रीमंत असे काळे बाजारवाले व उपटसुंभ कारखानदार स्थानापन्न सत्ताधारी झाले आहेत. पण त्यांच्या हातून कोणतें सांस्कृतिक कार्य घडत आहे हें पाहिलें म्हणजे वैयक्तिक अनेक दोष असलेल्या जुन्या राजांबद्दल कृतज्ञताच वाटेल.












## कथा-वाङ्मयांतील एक उच्चांक

'बनगरवाडी' प्रातिनिधिक प्रादेशिक शब्दचित्र आहे असें वर म्हटलें यांचें कारण हल्लीं जे देशाची आर्थिक व सामाजिक सशास्त्र पहाणी करणारे प्रादेशिक अहवाल प्रसिद्ध होत असतात त्यांशीं तुलतां, या गोष्टींतील वर्णनानें विशिष्ट स्थानिक परिस्थिति डोळयासमोर जास्त उभी राहते व मनावर ठसते हें होय. आणि अशांचाच उपयोग सुधारणेबाबत जनमनाची तयारी करण्यास होईल असा आम्हांस विश्वास वाटतो. वैयक्तिक मनांतील वा आयुष्यांतील, हजारांत किंबहुना लाखांत एखाद्याच्या मनांत येणारी, काल्पनिक मानसशास्त्रांतील, गूढ प्रश्नभूत घटना उकलून दाखविण्याचा 'अव्यापारेषु व्यापार' स्वतःच्या विकृत मनाच्या लीलेसाठीं करण्यापेक्षां, समाजाच्या विविध घटकांतील प्रातिनिधिक भावना—आशा—आकांक्षा वाङ्मयीन माध्यमांतून हृद्य स्वरूपांत मांडणें, जास्त शास्त्रीय म्हणजेच सत्यनिदर्शक व समाजोपयोगी आहे, यांत काय संशय ? मोठ्या शहरांच्या गर्दींतील काळोख्या, संकुचित जागेंतील कुजक्या उबट वातावरणांत तळलेल्या व काल्पनिक कथाकादंबऱ्या आणि फ्राइड, हॅवलॉक एलिस यांच्या तथाकथित मानसशास्त्रीय प्रमेयांच्या अभ्यासांत घोळलेल्या विकृत मनांतून बहुप्रसव झालेली कथासृष्टि समाजाच्या विकृतीलाच कारणीभूत होणार व होत आहे हा तर आजच्या तरुण पिढीकडे बघून विचारवंतांच्या मनांत येणारा पहिला विचार आहे. यावर तोडगा सत्यसृष्टि यथातथ्य उभ्या करणाऱ्या प्रस्तुत 'बनगरवाडी' सारख्या कथा होत.

स्थानिक भूगोल व त्यावर अवलंबून राहणारा दरिद्री समाज यांचें मनोवेधक वर्णन करणारी ही कथा आहे. त्याचप्रमाणें खेड्यांतील प्रातिनिधिक व्यक्तींचें शब्दचित्र रंगविण्यांत या कथेची माधुरी सांठवलेली आहे. शाळामास्तर या सर्व सृष्टीचा द्रष्टा असून त्याच्या मुखानेंच ही कहाणी सांगितली आहे व ग्रंथकारच शाळामास्तर बनले असल्यानें गोष्टींतील व्यक्तींच्या वर्तनावरील, घटनांवरील व घडामोडींवरील धावती टीका त्यांच्याच मनोव्यापाराची दर्शक आहे. कथेला गुंफणारा असा धागा हाच. मग त्या एका गांवाखालील दूरच्या वाडीचा, पाटिलवजा वृद्ध विचारी पुढारी कारभारी; नंतर प्रत्येक वस्तींत सदैव आढळणारा खलपुरुषरूप ग्रामकंटक; यानंतर क्रमानें सर्वसाधारणजनसमूह; त्यांतील विशेष कुशल व म्हणूनच थोडें द्रव्य गुपचुप सांठविणारा प्रतिष्ठित पुरुष; तसेंच काम न करितां पोट भरूं पहाणाऱ्या उनाड व्यक्ती; अत्यल्पसंतोषी व परोपकारी व्यक्ती; गांवाशीं कधींमधीं चुकून संबंध येणाऱ्या अधिकारी व्यक्ती; सर्वांशीं फटकून वागूं पहाणाऱ्या अभिमानी स्वार्थी व्यक्ती; संसारी घरधनीण व तिच्या संसाराला क्वचित् जाचणारी अशी घरच्या दुर्लक्षामुळें मोकाट बनलेली तरुणी; स्त्री पळविणारा बांड व तज्जन्य कलह; माणसांना त्याच्या कर्त्याशीं जोडणारी देवसंस्था व तिचा पुजारी गुरव; व अखेर त्याच्या कारवाईला न थांबवितां येणारी अस्मानी सुलतानी — हेंच सारें कोणत्याहि धनगरवाडीचें विश्व या दीर्घकथेंत सामावलेलें दृष्टीस पडतें.

प्रादेशिक भाषेची लज्जत हें प्रस्तुत कथा मनोवेधक व परिणामकारक होण्याचें प्रमुख कारण असलें तरी यांत आलेली भाषा सर्वस्वी शुद्ध खेडवळ नाहीं हें येथें सांगणें अवश्य वाटतें आणि असें होणें हें आमच्या जातिप्रधान समाजव्यवस्थेंत अपरिहार्यच म्हटलें पाहिजे. कांहीं ठिकाणीं अशिक्षित खेडवळ माणसाच्या तोंडीं सहसा येणार नाहींत असे शब्द त्यांच्या संभाषणांत घातले गेलेले आहेत. उदाहरणार्थ 'खुलासा' (पा. ७०), 'इष्टेट' (पा. ११०) हे शब्द त्या त्या माणसांच्या तोंडून येवूं नयेत असें वाटतें. यांत आजच्या सामान्य मराठी वाचकास शब्दशः न कळणारे अनेक स्थानिक शब्द आले आहेत. ते न समजल्यामुळें अर्थबोध होण्यास मात्र कांहींच अडथळा नाहीं. यांतील कांहीं शब्द व वाक्प्रचार अजून मराठी कोशांत समाविष्ट झालेले नाहींत. असे शब्द आणि वाक्प्रचार त्यांच्या वाङ्मयांतील उपयोगामुळें कायम भाषेंत शिरतील व अखेर कोशांतहि सोदाहरण संगृहीत होण्याचा मार्ग खुला होईल. महाराष्ट्रभाषाकोश परिपूर्ण होण्यास हाच एक मार्ग आहे.

गतवर्षीच्या दिवाळी-अंकांतील गोष्टींत न आलेला असा कांहीं वाढावा या स्वतंत्र छापील कथेंत दृष्टीस पडतो व त्यामुळें मूळ कथा रुपयांत दोन आण्यांनीं वाढलेली दिसते. धनगराचा शाळकरी मुलगा सता, कारभाऱ्याची नात अंजी व शेकूची मुंडाहात उंच बायको यांच्या चरित्रचित्रांनीं हीं पंधरा पानें वाढलेलीं








आहेत. यामुळें पुस्तिका थोडी जाड होण्यास मदत झालेली असेल, पण त्यामुळें गोष्ट परिणामकारक होण्यास हातभार लागलेला नाहीं. नवीन घातलेला भाग बेमालूम बसविण्याचा प्रयत्न ठीक साधला असला तरी ओघ थोडा कमी होण्यांत त्याचा परिणाम झाला आहे असें आम्हांस निश्चित वाटतें. या भागावांचून गोष्टींत कोणताहि उणेपणा भासत होता असें नाहीं. उलट अंजीचें अखेरचें वर्तन कांहींसें अनपेक्षित, खेड्यांतील निरागसपणाची पातळी खालीं आणणारेंच दिसतें. आमच्या मतें कलाकृतींत मागाहून कांहीं घुसडणें हें नेहमींच हानिकारक ठरणारें आहे. सद्या वाण्याच्या चुकीच्या उल्लेखासारख्या ओळी गाळल्या हें योग्य. पण कथेच्या शेवटच्या परिच्छेदांत दोन ओळी निष्कारण घातल्यानें मूळची गंभीर सूचकता नष्ट होऊन गद्य स्पष्टतेनें तिची जागा घेतल्यानें रसभंग होतो. अर्थात् हें नवें पुस्तकच वाचणारांस यांतील कांहींच जाणवणार नाहीं हें सांगावयास नको.

पुस्तकांतील चित्रासंबंधींहि कांहीं लिहिणें अवश्य वाटतें. दिवाळी-अंकांतील कांहीं चित्रें अकारण गाळलीं आहेत व जीं ठेवलीं आहेत त्यांच्या जागाहि चुकीनें बदलल्या आहेत. वेष्टनावरील चित्र मूळचें-धनगर मेंढ्या हाकीत आणीत आहेत तें-तसेंच ठेवणें सुयोग्य झालें असतें. कारण त्यानें मुख्य कथा एकदम डोळ्यांसमोर येते. आद्यंत येणाऱ्या व जाणाऱ्या मास्तराचीं चित्रें त्याच जागीं असलीं तरी शेवटचें चित्र मजकुरांतच मुळाप्रमाणें बसविणें इष्ट होतें. कारण या छोट्या कथेंत हीं रेखाचित्रें मजकुराला नेहमींच पूरक ठरणारीं काढलेलीं आहेत. ठेवलेलीं चित्रें प्रकरणारंभीं घालण्याची कल्पना अगदीं चुकीची आहे. तीं त्या त्या वर्णनांच्या जवळच दिवाळी-अंकांतल्याप्रमाणें परिणामकारक ठरतात. उदाहरणार्थ, चवथ्या पानावरील चित्र पांचव्या पानावर, अकराव्या पानावरील सातव्या पानावर, सतराव्या पानावरील अठराव्यावर, सव्वीसाव्यावरील विसाव्यावर घेऊन पहा. आहेत त्या ठिकाणीं हीं चित्रें निरर्थक आहेत. एवढेंच नव्हे तर कांहीं ठिकाणीं तीं अगदींच चुकीच्या जागीं घालण्यांत आलेलीं दिसतात. कांहीं चित्रें–बहुधा जुने ब्लॉक झिजल्या वा हरवल्यामुळें–नवीं काढलेलीं दिसतात. पण त्यांत जुन्या चित्रांतील मूळ वर्णनास धरून असलेले भाग नवीन आलेखनांत गळलेले दिसतात. उदाहरणार्थ, बासष्टाव्या पानावरील वर्णनास अनुसरून म्हणून काढलेलें एकुणसाठाव्या पानावरील नवें चित्र पहा. त्यांत झांजवाला गळून गेला आहे; हेंच काय, पण त्यांत गतवर्षींच्या चित्रांत उत्तम साधलेला नादब्रह्माचा आविष्कार रुमाल उडविणाऱ्या धनगरांच्या चेहऱ्यावर उमटलेला असा मुळींच दिसत नाहीं! आम्ही चित्रकला ही अशा गोष्टींत साहित्याची आवश्यक ती साथ करणारी समजत असल्यामुळें हें विवेचन केलें. डिकन्स, थॅकरे प्रभृति इंग्रज कादंबरीकारांच्या कृतींतील मूळ शंभर वर्षांमागें घातलेलीं वर्णनचित्रें आजहि जशींच्या तशीं उतरविण्यांत येतात हें त्यांच्या शताब्दी आवृत्त्या पाहिल्यानें समजेल, तीं चित्रें फीझ, क्रुकशँक प्रभृति नामांकित चित्रकारांनीं काढलेलीं असून त्यांची कीर्तिहि त्या चित्रांनीं डिकन्सइतकीच अमर केली आहे. इतकी कीं तीं चित्रें गाळल्यास कादंबरींतील वर्णनें फिकीं पडतील, क्वचित् नीटशीं समजणार नाहींत व त्या काळचें चित्र आजच्या वाचकाच्या डोळ्यांसमोर उभें राहण्यास कठीण जाईल. दीनानाथ दलाल प्रथितयश आहेतच, पण तरीहि त्यांनीं या बाबीकडे जास्त नजर पुरविल्यास साहित्यिकांबरोबर त्यांचीचि कीर्ति चिरंजीव होईल. प्रकाशकांच्या हातून याबाबत थोडा हलगर्जीपणाच झाला आहे असें आम्हीं दुःखानें नमूद करणें आमचें कर्तव्य समजतों.

**व्यंकटेश माडगूळकरांना**, जुन्या भाषेंत बोलावयाचें तर, वाडवडिलांच्या पुण्याईनें साहित्यशैली चांगली लाभली आहे. त्यांच्या मूळ खेड्यांतील भावनाहि निरागस आहेत. भाषेवर प्रभुत्वहि इतरांनीं हेवा करण्यासारखें त्यांनीं कमाविलेलें दिसतें. अशा तरुणास जागतिक वाङ्मयांत स्थान मिळविणेंहि कठीण जाऊं नये. कारण अशा गोष्टीला आवश्यक ते अंगचे – अभ्यासानेंच न साधणारे – गुण त्यांच्याजवळ आहेत. म्हणून त्यांनीं आपल्या लेखनाकडे ती केवळ आपलीच नव्हे, तर महाराष्ट्राची संपत्ति आहे, या दृष्टीनें पहावें. आम्ही सर्जनशील गुण हे ईश्वरी देणगीच्या स्वरूपाचे आहेत असें मानणारे आहोंत. शंभर शिष्यवृत्त्या देऊनहि योग्य असा माणूस तयार होऊं शकेल अशी आमची समजूत नाहीं. पण अंगभूत










अनुक्रमणिका

गुणांची उधळपट्टी, दुरुपयोग वा सदुपयोग करणें हें मात्र व्यक्तीच्या हातांत असतें. वाङ्मयसमीक्षक हा उपदेशक पाद्री नव्हे. पण समाजबांधव म्हणून अनुभवी-व्यक्तीचें कर्तव्य उरतेंच. तें या प्रसंगानें किंचित् करूं.

सध्यांचें युग टोळकें करून राहणारांचें आहे. आजचीं बरींच माणसें याच आश्रयावर जगतात व वाढतात. त्यांच्या अंगीं दुसरा गुण असा क्वचितच आढळतो. साहित्यिकांचींहि टोळकीं बनत असतांना दिसतात. टोळक्यांत बसणें – उठणें हें प्रस्तुत युगाचें व्यसन बनत असलेलें दिसतें. त्यांत निर्गुणी दुबळ्यांचा कांहीं फायदाहि होत असावा. पण गुणवान् व्यक्तींचे गुण यांत वाढण्याऐवजीं त्या व्यक्ती वाईट मार्गास लागण्याचा बळकट संभव मात्र अवश्य निर्माण होतो. आमच्या मतें माडगूळकरांचें बळ त्यांच्या ग्रामीण जीवनावरच अवलंबून आहे. हा विशेष त्यांचा हातचा आहे. हा गमावून बसल्यास त्यांची वाङ्मयसंसारांत फसगत होण्याचा संभव आहे. तेव्हां त्यांनीं हा ईश्वरदत्त गुण टिकवावा, नव्हे वाढविण्याचा प्रयत्न चालू ठेवावा.

यासाठीं शहरी पांढरपेशे होण्याचा मोह टाळला पाहिजे. त्या मोहांत ते गुरफटत चालले असल्याचें आम्हास दुरूनच दिसतें व त्यांच्या अगदीं कालच्या नवीन लिखाणाचा यास पुरावाच मिळतो. गुणकर्मविभागानुसार प्रत्येक व्यक्तीचा असा एक स्वधर्म निसर्गतःच सिद्ध होत असतो. त्या स्वधर्माचें सतत पालन करणें व तसाच बांका प्रसंग दुर्दैवानें ओढवल्यास त्याच स्वधर्मपालनांत निधनहि पावणें हें कोणत्याहि क्षेत्रांतील व्यक्तीचें कर्तव्य ठरतें. तेंच त्या व्यक्तीच्या यशाला व सुकीर्तीला कारणीभूत होतें. चिरंजीव निर्मल वाङ्मयनिर्मिति हीहि एक तपस्या आहे. पण तीसाठी यमनियमप्राणायामादि पथ्यें पाळावीं लागतात. विचारांचें पावित्र्य टिकवावें लागतें. आचरणहि मनःपूत करून चालत नाहीं. फार काय, बाह्यवेष सुद्धां या सर्वांना पोषक असाच निवडावा लागतो. म्हणून आमची विनंति अशी कीं त्यांनी इतर गुणांच्या व्यक्तींशीं त्यांच्या स्वगुणनिर्मित क्षेत्रांत स्पर्धा किंवा साधें अनुकरणहि करण्याचा मोह टाळावा. दुसरे मानसशास्त्रीय कोडीं उलगडून दाखविण्याच्या धंद्यांत पडतात किंवा स्त्रीजीवनाचे प्रश्न कथांतून हाताळतांना दिसतात किंवा बड्याबड्या पाश्चात्त्य वाङ्मयपंथांची री ओढतात म्हणून खोट्या मोठेपणाच्या वा पडद्यावर येण्याच्या तारुण्यसहज हौसेनें या परधर्मांत शिरूं नये. हें सर्व त्यांच्या गुणकर्मांत बसणार नाहीं. आपणास उच्च शिक्षण किंवा उच्च प्रतिष्ठित धंदा-उद्योग लाभलेला नाहीं याबद्दलहि खंत बाळगण्याचें त्यांस कारण नाहीं. वर उल्लेखिलेला नोबेल बक्षीस मिळविणारा नॉर्वेजिअन कॅन्यूट हॅमसन हा खेड्यांतील शिक्षक, चांभाराच्या दुकानांतील मदतगार व देश सोडून समुद्रापलीकडे अमेरिकेंत जाऊन पोटासाठीं ट्रॅम-कंडक्टर झालेला माणूस आरंभीं होता आणि उतार वयांत लेखक होऊन अखेरीस तीस वर्षें ओसाड खडकाळ नॉर्वेतील बर्फमय प्रदेशांत आपल्या गांवीं शेती करीत राहिला होता. इतकेंहि करून तो नव्वद वर्षांवर जगला. वर सांगितलेलें त्याचें आयुष्य त्याच्या सदाचरणाचा स्वयंभू पुरावा होय. माडगुळकरांप्रमाणेंच जन्मजात ईश्वरदत्त गुण वांट्याला आले असून केवळ स्वधर्म सोडून आडरानांत शिरल्यामुळें त्या सर्व गुणांवर पाणी पडून आयुष्याचा खेळखंडोबा झालेल्यांचीं उदाहरणें आमच्या डोळ्यासमोर असल्यामुळेंच आम्हास एवढें लिहिणें सुचलें, असें सांगून हें प्रासंगिक परीक्षण पुरें करतों. तसेंच त्यांस सन्मार्ग दिसून त्यांच्या हातून उत्तरोत्तर ' बनगरवाडी' पेक्षांहि सरस वाङ्मय निर्माण होऊन त्यांच्या व त्यारूपानें मराठी भाषेच्या वैभवांत भर पडो असें इच्छितों. ज्या माणदेशाचें त्यांना प्रेम, त्या देशाला त्याचें नांव मानांक किंवा माणराज या राष्ट्रकूट राजाच्या मानपुर म्हणजेच माण या राजधानीवरून मिळालें. चौथ्या शतकापासून हा प्रदेश एक संस्कृतीचें केंद्र बनलेला दिसतो. येथील राजांचा अंमल दक्षिण महाराष्ट्र व कोंकण या प्रदेशावर गोव्यापर्यंत पसरलेला होता. आटपाडी हें नांवहि रट्टपाडी या प्राचीन ताम्रपटांतील नांवाप्रमाणें आठ पाड्यांच्या म्हणजे वाड्यांच्या समूहावरून पडलेलें दिसतें. अशा पंधराशे वर्षें संस्कृतीचें केंद्र असलेल्या एका प्राचीन प्रदेशांत माडगूळकरांचा जन्म झालेला असल्यामुळें त्यांचा अभिमान योग्य ऐतिहासिक स्थानावर केंद्रित झाला आहे असें म्हणावेंसें वाटतें. काळाच्या ओघांत ऐतिहासिक व भौतिक परिस्थितींत बदल झाल्यामुळें माणगंगेवरील हें केंद्र आज मागें पडल्यासारखें वाटत असलें, तरी त्याला मूळची अशी एक स्वतंत्र परंपरा असलेली दिसते व तीच मांडगुळकरांच्या कथांत उमटलेली असावी.








श्री. पीटर वाइल्स

# सोव्हिएट युनिअनमधील औद्योगिक प्रगति

[ **श्री. पीटर वाइल्स** हे ऑक्सफर्ड विद्यापीठांत अर्थशास्त्राचे प्राध्यापक आहेत. मॉस्को एकॉनॉमिक कॉन्फरन्सला १९५२ सालीं जें ब्रिटिश प्रतिनिधिमंडळ गेलें होतें, त्यांत श्री. पीटर वाइल्स हे होते. नुकतीच गेल्या सप्टेंबर १९५५ मध्यें मिलान येथें ' **कॉंग्रेस ऑफ कल्चरल फ्रीडम** ' भरली होती. त्या कॉंग्रेससमोर श्री. वाइल्स यांनीं ' सोव्हिएट उद्योगधंद्यांचें यश ' ( ' Success of Soviet Industry' ) या विषयावर एक निबंध वाचला. त्या निबंधाचा सारांश बी. बी. सी. च्या ' लिसनर ' च्या २० ऑक्टोबर १९५५ च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्या सारांशाच्या आधारें पुढील लेख संकलित केला आहे. – का. सं. ]

अमुक अर्थव्यवस्था चांगली कीं वाईट हें ठरवितांना, त्या अर्थव्यवस्थेंत निर्माण झालेल्या संपत्तीची समाजांतील व्यक्तींमध्यें आणि वर्गांमध्यें न्याय्य व सम वांटणी होते आहे कीं नाहीं, लोकांना लागणाऱ्या उपभोग्य वस्तूंचा पुरवठा त्या अर्थव्यवस्थेंतून पुरेसा होत आहे कीं नाहीं, त्या अर्थव्यवस्थेमधून उत्पन्न होणारे राजकीय व सामाजिक परिणाम इष्ट होतात कीं नाहीं इत्यादि गोष्टींचा विचार केला जातो. पण एवढ्या गोष्टींचाच विचार करून अर्थव्यवस्थेची कसोटी लागूं शकत नाहीं. अर्थव्यवस्थेची सर्वांत महत्त्वाची व अत्यंत स्पष्ट कसोटी म्हणजे त्या अर्थव्यवस्थेमधून उत्पादन किती होत आहे ही होय. कारण कोणत्याहि अर्थव्यवस्थेचें प्रमुख उद्दिष्ट मानवी गरजा भागविणें हें आहे.

सोव्हिएट युनिअनमधील आर्थिक उत्पादनाच्या वाढीचें प्रमाण जगांतील कोणत्याहि महत्त्वाच्या ' स्वतंत्र ' देशांतल्यापेक्षां जास्त आहे, ही वस्तुस्थिति ' नजरेंत भरते. कम्युनिस्टेतर देशांत सर्वांत जास्तींत जास्त उत्पादनाच्या वाढीचें प्रमाण जपानचें आहे. १९१२ ते १९३७ या काळांत जपानचें उत्पादनवाढीचें प्रमाण दरवर्षी शेंकडा ३ होतें. सोव्हिएट अर्थव्यवस्थेंत हें प्रमाण युद्धापूर्वी शेंकडा ५½ होतें. व १९४८ नंतर शें. ७½ झालें. खनिज व कारखान्यांतील उत्पादनाचें प्रमाण कोणत्याहि अर्थव्यवस्थेंत सर्वोच्च असतें. त्या बाबतींतील आंकडे पहातां, जपानचें त्या उत्पादनाचें प्रमाण शें. ७ आहे, तर सोव्हिएट युनिअनचें शें. १२ आहे. सोव्हिएट युनिअनच्या या सर्वोच्च औद्योगिक उत्पादनक्षमतेमुळें, त्यांचें राष्ट्रीय उत्पन्न-( national income ) हें हि सर्वांत जास्त आढळून येतें.

सोव्हिएट युनिअनच्या या सर्वोच्च उत्पादनक्षमतेचीं कारणें काय असावींत ?–– एक कारण असें पुढें केलें कीं, सोव्हिएट युनिअनच्या कक्षेंतील जीं अंकित राष्ट्रें ( satellites ) आहेत त्यांचा या कामीं 'वापर' ( ' exploitation ' ) होतो. परंतु ह्या कारणाचा विचार करतांना, हेंहि ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं ह्या 'अंकित' राष्ट्रांच्या अर्थव्यवस्थाहि सोव्हिएट युनिअनप्रमाणेंच विकास व भरभराट पावल्या आहेत. सोव्हिएट युनिअननें या अंकित राष्ट्रांना वापरलें असलें तरी त्याबरोबरच सोव्हिएट युनिअननें चीनला विपुल मदत केली आहे ही गोष्टहि लक्षांत घेणें जरूर आहे.

कम्युनिस्टांच्या औद्योगिक प्रगतीचें एक कारण त्यांच्या **औद्योगिक कार्यक्षमतेंत** ( Industrial Efficiency मध्यें ) आहे. त्यांची एक विशिष्ट नियोजनपद्धति आहे. उत्पादनांत कोणतीं उद्दिष्टें (targets) गांठावयाचीं तीं निश्चित केलीं जातात व तीं गांठायच्या बाबतींत अधिकारी मंडळी, कारखान्याचे चालक, कारखान्यांत काम करणारा प्रत्येक कामकरी यांच्यात जणूं अहमहमिका लागते. शिवाय, हीं उद्दिष्टें दरवर्षी वाढविलीं जातात. शिवाय, जे कर लादले जातात त्यांची वाढती श्रेणी दिसून येत नाहीं. ('taxes are not highly progressive'). उत्पन्नावरील कर शेंकडा १३ इतका आहे. प्रत्यक्ष करां-








च्या बोजा खाद्य पदार्थांवर पडलेला दिसून येतो; कारखान्यांतून निर्माण होणाऱ्या 'चैनी'च्या अवांतर वस्तूंवर नव्हे. यांशिवाय आणखी एक कारण म्हणजे कम्युनिस्टेतर देशांत असलेले मालमत्तेवरील मालकी हक्क, भागीदारांचे हितसंबंध या गोष्टी सोव्हिएट युनिअनमध्यें नसल्यामुळें तज्जन्य अडथळे उत्पन्न होत नाहींत. सर्व राष्ट्राचा उद्योगधंदा हा विभाग एकसंध, एकमुखी चालतो.

कम्युनिझमचें आणखी एक वैशिष्टय सो॰युनिअनच्या वाढत्या उत्पादनक्षमतेला उपकारक आहे. कम्युनिस्ट देशांतून ट्रेड युनिअन्स साफ खच्ची केलेल्या असतात. कम्युनिस्टेतर देशांतून ट्रेड युनिअन्स पाहिलीं तर त्यांचा, मजुरी किती असावी, किती तास काम असावें, कामाच्या शर्ती काय असाव्या इत्यादींवर किंबहुना हरएक गोष्टीवर सर्वंकष प्रभाव दिसून येतो. त्याचा परिणाम असा होतो कीं, कारखान्यांचें उत्पादन वाढत नाहीं; फार तर आहे तेवढेंच कायम रहातें. कम्युनिझममध्यें ही भानगड नाहीं. जे कांहीं कामकरी–संघ आहेत ते औद्योगिक प्रश्नांच्या बाबत कम्युनिस्ट पक्षाचें धोरण निमूटपणें पाळतात. जर अधिकाऱ्यांना अमुक गोष्टी व्हायला पाहिजे असतील तर कामगार-संघांनीं त्या 'उत्स्फूर्तपणें' आपण होऊन अंगीकारल्या आहेत असा बनाव घडवून आणतां येतो. – कम्युनिस्टेतर 'स्वतंत्र' देशांतून असें दिसून येतें कीं, उत्पादनाचें एकादें नवीन तंत्र (technique) अवगत झालेलें असलें तर त्याकडे भांडवलदारांकडून किंवा ट्रेड युनिअन्सकडून जाणूनबुजून डोळेझांक केली जाते किंवा त्याला विरोध केला जातो. ही गोष्ट सोव्हिएट युनियनमध्यें आढळून येत नाहीं. 'ट्रेड सिक्रेट' हा तेथें गुन्हा आहे. एखाद्या नवीन तंत्राचा (technique चा) लागलेला शोध गुप्त ठेवणें हें तेथें घातपाताच्या कृत्याइतकें भयंकर समजलें जातें. नवीन तंत्राचा ज्यानें शोध लावला आहे त्या संशोधकाला सरकारकडून चांगली बिदागी मिळते. समाजवादी अर्थव्यवस्थेंत स्पर्धा (competition) असते. पण ती स्पर्धा एखाद्या शर्यतीसारखी असते. त्यांतून संघर्ष उत्पन्न न होतां ती अधिकाधिक निर्मितीला प्रेरणा देत असते.

सोव्हिएट अर्थव्यवस्थेंत, इतर देशांच्या अर्थव्यवस्थांच्या मानानें, उद्योगधंद्यांतून पुष्कळच जास्त भांडवल गुंतविलें जातें. त्यामुळें घरबांधणीसारख्या कार्याच्या वांट्याला पुष्कळच कमी रक्कम मिळते. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, सोव्हिएटमधील औद्योगिक प्रगति ज्या मानानें जास्त त्या मानानें रहायला घरांची तरतूद कमी.

सोव्हिएटमधील सर्वोच्च उत्पादनाला आणखीहि एक कारण आहे. तें म्हणजे कम्युनिझममागील प्रेरक तत्त्वप्रणाली होय. मानवी इतिहासाचा गाभा म्हणून वर्गकलहाच्या खालोखाल कम्युनिझम् जर कशाला महत्त्व देत असेल तर तें भौतिक प्रगतीला होय. कम्युनिस्ट विचारसरणीप्रमाणें मानवी इतिहासांतील प्रगतीचा शेवटचा टप्पा म्हणजे 'संपूर्ण कम्युनिझम्' ('Full Communism') होणें होय. संपूर्ण कम्युनिझम्च्या अवस्थेंत उत्पादन व उत्पादनक्षमता एवढी प्रचंड वाढेल कीं त्या विपुल सुबत्तेंत सर्व माणसांच्या गरजा भागवितां येतील आणि पैशाची व हिशेब ठेवायचीहि जरूरी राहणार नाहीं. हें काल्पनिक सुख-स्वप्न (Utopia) असलें तरी तें शेवटीं अवतीर्ण होणार अशी कम्युनिस्टांची त्यावर नितांत श्रद्धा आहे. सोव्हिएट युनिअन त्या 'संपूर्ण कम्युनिझम' कडे आतांच वाटचाल करीत आहे, असें तेथील अधिकारपदस्थ आवर्जून सांगत असतात. युरोपमध्यें मध्ययुगांत ख्रिश्चनांनीं 'सिटी ऑफ गॉड' बांधण्याची महत्त्वाकांक्षा धरली होती. तितकीच कडवी धार्मिक निष्ठा सोव्हिएट युनिअनची भौतिक प्रगति निर्माण करण्याविषयींची आहे.

सोव्हिएट युनिअनच्या उत्पादनक्षमतेविषयीं जें वर विवेचन केलें आहे, तें वाचून कित्येकांना राग येईल व कित्येकांचा गैरसमजहि होईल याची मला जाणीव आहे परंतु वरील विवेचन करण्यामागें कम्युनिझमबद्दल राजकीय सहानुभूति नसून केवळ वस्तुस्थिति काय आहे ती कथन करण्याचाच उद्देश आहे. वर जे सोव्हिएट उत्पादनवाढीच्या प्रमाणाचे आंकडे दिले आहेत ते सोव्हिएट सरकारच्या पत्रकांतून घेतलेले नाहींत. सोव्हिएट सरकारच्या पत्रकांतील आंकडे यांपेक्षां पुष्कळच मोठे आहेत. परकीय तज्ज्ञांनीं सोव्हिएट परिस्थितीचें प्रत्यक्ष निरीक्षण करून जे आंकडे जमा केले आहेत त्यांचाच या लेखांत आधार घेतला आहे.

कित्येक वेळां सोव्हिएट अर्थव्यवस्थेंत दिसून येणाऱ्या कांहीं दोषांवर सडकून टीका केली जाते. तेथें कांहीं कारखान्यांतून कामचुकारपणा, वशीलेबाजी, लबाडी हे प्रकार झालेले खुद्द सोव्हिएट युनिअनचीं वृत्तपत्रेंच कबूल करतात. त्यामुळें सोव्हिएट आर्थिक संघटना कार्यक्षम कशी म्हणतां येईल अशी शंका येणें स्वाभाविक आहे. पण थोडा विचार केला तर ही शंका अवास्तव असणें शक्य आहे असें दिसून येईल. कित्येक वेळां सोव्हिएट वृत्तपत्रांतून कारखान्यांतील कामचुकारपणा, ढिलाई, वशीलेबाजी वगैरेवरील टीका मुद्दामच बाजवीपेक्षां जास्ती कठोरतेनें केली जाते. हेतु हा कीं, लोकांनीं अधिक जागरूक रहावें. शिवाय ही आत्मपरीक्षणाची पद्धति हें सोव्हिएट राज्यव्यवस्थेचें खास वैशिष्ट्य आहे. कांहीं उद्योगधंद्यांत मागसलेंपण दिसून येतें तें घालविण्याकरितां मध्यवर्ती सरकार दोषाविष्काराच्या या कठोर मार्गाचा अवलंब करतें. ज्या अर्थी औषधोपचार चालू आहे त्या अर्थी कांहीं रोग किंवा आजार असला पाहिजे हें अनुमान बरोबर असलें तरी औषधोपचार चालू आहेत म्हणून डॉक्टरच अपेशी ठरले असें अनुमान करणें युक्त होणार नाहीं. – कम्युनिस्टेतर देशांतील स्वतंत्र अर्थव्यवस्थेमध्यें कांहीं दिवाळीं निघतात म्हणून ती अर्थव्यवस्थाच कोणी कुचकामाची ठरवीत नाहीं. उलट, दिवाळें वाजणें म्हणजे नालायक कारभाराबद्दल स्वतंत्र अर्थव्यवस्थेनें ठोठावलेली शिक्षाच होय असेंच समजणें सयुक्तिक होईल.

सोव्हिएट युनिअनमधील शेतीविषयक योजना यशस्वी न झाल्यामुळें, उपभोग्य व खाद्य कृषिजन्य वस्तूंचें उत्पादन खूपच कमी झालें एवढें खरें. खाद्य पदार्थापेक्षां, कारखान्यांतून उत्पन्न होणारा माल तेथें अधिक स्वस्त आहे. असें जें म्हणतात कीं क्रुश्चेव हल्लीं आपल्या जनतेला जेवढें खायला देऊं शकतो त्यापेक्षां झार निकोलस जास्त देत असे, तें खरें आहे. याचें कारण कम्युनिस्ट ज्या पद्धतीनें आपली शेतीयोजना लोकांच्या गळीं उतरवूं पहातात त्या चुकीच्या पद्धतींत आहे – अलीकडे शेतीची उत्पादनक्षमता थोडी वाढूं लागली आहे.

सोव्हिएट औद्योगिक उत्पादनक्षमतेच्या तुलनेनें पहातां, 'स्वतंत्र' लोकशाही देशाची उत्पादनक्षमता जरी हल्लीं कमी दिसत असली, तरी ती पुढें वाढून सोव्हिएटच्या बरोबर येऊं शकणार नाहीं असें नाहीं. मात्र त्याकरितां संपूर्णपणें अनियंत्रित धोरण (laissez faire) चें धोरण ठेवून चालणार नाहीं. उलट पक्षीं कम्युनिस्टांनीं अवलंबिलेलें अति-नियंत्रणाच्या धोरणाचें अनुकरण करण्याचीहि गरज नाहीं. कम्युनिस्ट सरकारच्या हातीं सर्वंकष सत्ता आहे. आर्थिक प्रगतीकरितां इतक्या सर्वंकष सत्तेची खरोखरीं जरूरी नाहीं. आपल्या सारख्या लोकशाही 'स्वतंत्र' देशांतून राष्ट्रीयीकरणाचीहि जरूरी नाहीं. पण राष्ट्रीयीकरण न करतां, आर्थिक उत्पादनांत सुसूत्रता व व्यवस्था आणतां येईल इतकी सत्ता मात्र आपल्या 'स्वतंत्र' लोकशाही सरकारांना मिळाली पाहिजे. ('It is not nationatisation we need, but state power to rationalize'.) म्हणजे उद्योगधंद्यांचे कारखाने एका संचालकत्वाखालीं एकत्र आणतां आले पाहिजेत, निरनिराळ्या उत्पादनशाखांकडून खास विशिष्टच उत्पादन (Specialization) करवून घेतां आलें पाहिजे, जो माल निर्माण होईल त्याचा दर्जा एकच ठेवतां आला पाहिजे, ट्रेड असोशिएशन्स विसर्जित करतां आल्या पाहिजेत. खाजगी मालकीचा बाहेरचा सर्व कायदेशीर सांगाडा ठेवूनहि, आर्थिक उत्पादनाची व्यवस्था आणि संयोजन याबाबतींत आवश्यक ते बदल घडवून आणण्याचा मध्यवर्ती शासनसत्तेला अधिकार पाहिजे. मध्यवर्ती सरकारनें आपली सबंध शंभर टक्के योजना लादण्याची जरूरी नाहीं. उद्योगधंदे नीट कार्यक्षम रीतीनें चालले आहेत कीं नाहीं, हें मात्र मध्यवर्ती सरकारनें डोळयांत तेल घालून पाहिलें पाहिजे व त्याकरितां अवश्य ते अधिकार घेतले पाहिजेत.

कम्युनिस्टांनीं वरिष्ठ दर्जाची उत्पादन-क्षमता दाखवून आपल्या लोकशाही राष्ट्रांच्या निश्चयशक्तीला व संयोजनसामर्थ्याला आव्हानच दिलें आहे. अर्थात् ही उत्पादनक्षमता साधतांना कम्युनिस्टांना राजकीय, मानवी व नैतिक मूल्यें गमवावीं लागलीं आहेत. जर आपण समजूतदारपणें व खंबीरपणें वागूं शकलों तर तीं मूल्यें न गमावतां, आपणांस तितक्याच वरिष्ठ दर्जाची उत्पादनक्षमता गांठतां येईल, यांत शंका नाहीं.








**श्री. सुरिंदर सूरि**

# डॉ. आल्बर्ट आइन्स्टीन यांच्याविषयींच्या कांहीं आठवणी

[ **श्री. सुरिंदर सूरि** यांनीं १९४९ सालीं सुप्रसिद्ध **डॉ. आल्बर्ट आइन्स्टीन** यांची मुलाखत घेतली. त्या मुलाखतीविषयीं श्री. सूरि यांचा लेख ' दि रॅडिकल ह्युमॅनिस्ट ' ( २५-९-५५ ) मध्यें आला आहे. त्या लेखांत मुलाखतीच्या दिलेल्या हकीगती-वरून डॉ. आइन्स्टीन यांचें व्यक्तित्व व त्यांचीं मतें यांविषयीं उद्बोधक माहिती मिळते. त्या लेखांतून पुढील भाग उद्धृत केला. आहे..– का. सं. ]

डॉ. आइन्स्टीन यांना भेटायचें माझ्या मनांत बरेच दिवसांपासून होतें. डॉ. आइन्स्टीन यांनीं गांधीं-बद्दल अत्यंत प्रशंसात्मक उद्गार काढलेले मी वाचले होते. ' गांधींसारखा एक मनुष्य या पृथ्वीतलावर होऊन गेला यावर पुढील पिढ्या विश्वासहि ठेवणार नाहींत ' हें एक गांधींविषयींचें त्यांचें मत वाचून, मला मोठें कुतूहल वाटलें होतें. एका विज्ञाननिष्ठ शास्त्रज्ञाला वैज्ञानिक यंत्र-संशोधनाला विरोध करणाऱ्या ईश्वरनिष्ठ महात्म्याविषयीं एवढी आदरभावना कां असावी हें मला समक्ष जाणून घ्यावयाची इच्छा उत्पन्न झाली. शिवाय डॉ. आइन्स्टीन यांनीं आपल्या आत्मचरित्रांत लिहिलेलें माझ्या वाचनांत आलें होतें कीं, ' परंपरा-गत धर्मानें मला आध्यात्मिक समाधान लाभलें नाहीं, म्हणून मी विज्ञानाकडे वळून त्याला वाहून घेतलें '. शास्त्रज्ञाच्या तोंडीं हे उद्गार अनन्यसाधारण असे मला वाटले. कदाचित्, आइन्स्टीन दुसऱ्या एखाद्या देशांत किंवा अन्य काळीं जन्मले असते, तर ते महान् संत झाले असते, कोणीं सांगावें !

म्हणून डॉ. आइन्स्टीनची समक्ष भेट घ्यायची मला फार उत्सुकता होती. प्रो. पॉल शिल्प ( Paul Schillp) यांनीं माझी त्यांच्याशीं भेट घडवून आणली. भेटण्यापूर्वी शिल्प यांनीं मला असें सुचविलें होतें कीं जे कांहीं प्रश्न विचारावयाचे असतील ते एका कागदावर लिहून दिलेत तर तें आइन्स्टीनना आवडेल.–आइन्स्टी-नना पूर्वी एक कोणी हिंदुस्थानांतला मनुष्य भेटायला आला असतांना त्यानें आइन्स्टीनच्या पायां पडून बोलायला सुरुवात केली होती त्यावेळीं आइन्स्टीन यांना किती चमत्कारिक व अस्वस्थ वाटलें होतें, तेव्हां-पासून कोणाला भेटायचें म्हणजे आइन्स्टीन यांना कसें सांकडें वाटत असे, भेटीचें कारण जाणून घेण्याची आधींच ते कशी काळजी घेत असत, हें मला मागा-हून कळलें.

जून १९४९ मध्यें एका दुपारीं मी आइन्स्टीनना भेटलों. त्यावेळीं कांहीं गोष्टी मला विशेष वाटल्या. एक म्हणजे त्यांची खोली मला सुसज्ज दिसून आली नाहीं. एकप्रकारें ओकी व अव्यवस्थित अशी ती खोली मला वाटली. आइन्स्टीन स्वतः एका मोठ्या डेस्कामागें बसले होते. त्या डेस्कावर दहाबारा पुस्तकें अस्ताव्यस्त पडलेलीं होतीं. खोलींत पुस्तकांची एकदोन शेल्ह्ज् दिसलीं. त्यांतून पुस्तकें थोडींच होतीं. खोलींत पुरेसा प्रकाशहि वाटत नव्हता. आइन्स्टीन यांच्या फोटोवरून ते दिसायला जरा नाजूक व स्वप्नाळु स्वप्नदर्शी ( angelic ) असावेत अशी मी कल्पना केली होती. परंतु त्यांना प्रत्यक्ष पाहून मला तसें वाटलें नाहीं. त्यांचा बांधा मजबूत होता. चेहरा चांगलाच मोठा व नाक – डोळे ठसठशीत होते. कारखान्याचा एखादा व्यवस्थापक जसा धिम्मा व जमिनीवर पक्के पाय रोंवलेला असावा तसे ते मला वाटले. मी त्यांच्यासमोर जाऊन बसलों तों ते मला विचारांत मग्न दिसले. इतके कीं, आपण अनाहूत तर आलों नाहीं ना, आपल्या अनपेक्षित येण्यानें यांना व्यत्यय तर आला नाहीं ना, असें मला वाटून गेलें. पण लगेच दुसऱ्याच क्षणीं त्यांनीं स्नेहपूर्ण रीतीनें स्मितपूर्वक आपला हात पुढें केला. पण पुढल्याच क्षणीं त्यांच्या चेहऱ्यावरील स्मित मावळून, त्यांचा चेहरा पूर्ववत् विचारमग्न दिसूं लागला.

माझ्या प्रश्नांचा कागद मी त्यांच्या हातीं दिला. माझें अक्षर सुवाच्य नव्हतें. तें कसेंबसें लावीत त्यांनीं माझे प्रश्न वाचून काढले.

" गांधींचा विज्ञानाला विरोध असतां त्यांच्याबद्दल आपणांस विशेष आदर कां वाटतो ? " असा माझा एक प्रश्न होता. आइन्स्टीननीं उत्तर दिलें– " गांधींचा विज्ञानाला विरोध होता, असें मला वाटत नाहीं. विज्ञानानें शोधून काढलेल्या यंत्रांचा जो दुरुपयोग








होत आहे त्याला त्यांचा विरोध होता. त्यांच्या वेळीं हिंदुस्थानावर राजकीय वर्चस्व गाजविणाऱ्या ब्रिटिशांचा हिंदी उद्योगधंद्यांवर जो अनिष्ट पगडा बसला होता, त्यामुळें तर त्यांचा विरोध विशेष तीव्र झाला होता."

" मग गांधींमध्यें विशेष प्रशंसनीय असें आपणांस काय आढळून आलें ? " मी त्यांना विचारलें.

आइन्स्टीन म्हणाले : " गांधींची न्यायबुद्धि विशेष होती. प्रत्येकाला ते न्याय देत, ब्रिटिशांना देखील. ( Gandhi was just towards every one, even towards the British. ) शिवाय गांधींचा संयम किंवा तोल कधींच सुटला नाहीं. "

माझा पुढील प्रश्न असा होता : "जीवनाचें ध्येय ठरविण्याच्या बाबतींत तरुणांना आपण काय मार्गदर्शन करूं शकाल ? " आइन्स्टीननीं या प्रश्नाचें उत्तर देण्याचें नाकारलें. ' दुसऱ्यांना त्यांच्या जीवनांत काय ध्येय असावें हें सांगणें माझें काम नव्हे ' असें ते म्हणाले.

" आपल्या जीवनाचें ध्येय काय ? " मी त्यांचा पिच्छा पुरवीत त्यांना विचारलें.

ते म्हणाले : " जीवनाला कसलें आलें आहे ध्येय नि हेतु ? जीवनाचें ध्येय काय आहे असें म्हणण्यापेक्षां जीवनांत ध्येय काय आहे, असें म्हणणें बरें. "

" मग आपल्या जीवनांत ध्येय काय आहे ? " मी विचारलें.

" निसर्गाचे नियम समजावून घेणें " आइन्स्टीन म्हणाले.

" आपणांस त्यांत कितीसें यश आलें आहे असें वाटतें ? " मी विचारलें. ' फार थोडें ' असें त्यांनीं म्हटलें व किती थोडें तें दाखविण्याकरितां बोटाची चिमुट करून दाखविली.

" मग आपलें जीवन अयशस्वी झालें असें आपण मानतां कां ? " मी एकदम बोलून गेलों आणि आपण जरा मर्यादाभंग तर केला नाहीं ना अशी मला चुटपुट लागली. आइन्स्टीन आतांपर्यंत बोलतांना माझ्याकडे पहात नव्हते. पण या माझ्या प्रश्नामुळें त्यांनीं माझ्यावर दृष्टि रोखून, शांत धिम्मेपणानें उत्तर दिलें : " छे ! मानवी प्रयत्नांचें मूल्य त्यांच्या यशापयशावरून न ठरवितां मानव ज्या प्रेरणेनें प्रयत्न करीत आहे त्या प्रेरणेवरून ठरवावयाचें असतें. माझी स्वतःचीच जर गोष्ट घेतली, तर निसर्गाचे नियम समजावून घ्यावयाचा मी खूप प्रयत्न केला आहे. "

" समजा, निसर्गाचे नियम ज्ञात झाले, तरी त्याचा काय उपयोग ? त्यापासून असें कोणतें चांगलें होणार आहे ? " मी विचारलें.

आइन्स्टीननीं उत्तर दिलें — " मानवानें प्रयत्न करीत रहाणें यांतच त्याची परिपूर्ति आहे प्रयत्नापलीकडे आणखी कांहीं असलेंच पाहिजे अशी आवश्यकता नाहीं. " ते पुढें म्हणाले : " तरी पण निसर्गाचे सर्व नियम संपूर्णपणें मानवाला समजून येऊं शकतील असें मला वाटत नाहीं. "

" आपण हिंदुस्थानच्या लोकांना कोणता संदेश देतां ? " असा माझा शेवटचा प्रश्न होता. आइन्स्टीन याचें उत्तर द्यायला तयार नव्हते. " हिंदुस्थानच्या लोकांना माझ्यासारख्यानें संदेश देणें लहान तोंडीं मोठा घांस घेतल्यासारखें अहंकारीपणाचें होणार नाहीं का ? " असें ते म्हणाले तरी पण मी आग्रह केलाच. " आल्बर्ट आइन्स्टीन याना मी भेटून आलों हें माझ्या देशबांधवांना मी कोणत्या तोंडानें सांगू ? " मी काकुळतीनें म्हटलें. तेव्हां ते म्हणाले— " त्यांना माझे नमस्कार सांगा. जगांत शांति प्रस्थापित करण्याच्या कामीं हिंदवासीय फार महत्त्वाची कामगिरी करणार आहेत अशी माझी त्यांच्याविषयींची भावना त्यांना निवेदन करा. "

त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्यांची संस्था सोडून मी गेलों. त्यावेळचें आइन्स्टीन यांचें शेवटचें दर्शन मला आठवतें. दुपारची वेळ होती. जेवणाकरितां आइन्स्टीन आपल्या सहकाऱ्याबरोबर संस्थेच्या मोकळ्या मैदानांतून चालत जात होते. त्यांच्या अंगांत विंगट रंगाचा जाड स्वेटर होता. विजारीला सुरकुत्या पडलेल्या होत्या. डोक्यावरील पांढरे केस अस्ताव्यस्त भुरभुरत होते. अशा त्यांच्याकडे बघून हा एक महान् जिप्सीच ('a glorified tramp') आहे असें मला वाटून गेलें. ते जात असतांना मी त्यांच्याकडे सारखा पहात होतों. शेवटीं त्यांची ती आकृति दूरदूर जात, दूरच्या झाडांच्या मेहेरापी चौकटींत दिसेनाशी झाली. आल्बर्ट आइस्टाइन यांचें हें शेवटचें दर्शन माझ्या मनांत इतकें ठसून गेलें आहे कीं त्याचें वर्णन करणें अशक्य आहे.








श्री. मधुकर जावडेकर

# शिंपवली येथील ' ग्रामीण-जीवन-परिषद् '

गेल्या आक्टोबर १९५५ च्या २८, २९ व ३० तारखेस बोरीवलीनजीक शिंपवली येथील कोरा ग्रामोद्योगकेंद्रांत एक ' ग्रामीण-जीवन-परिषद् ' (' Rural Life Conference ') भरविण्यांत आली होती. परिषदेचे संयोजक श्री. खेर, उद्घाटक मुख्यमंत्री श्री. मोरारजीभाई देसाई व ग्रामीण जीवन-विषयक प्रश्नांचें एक थोर व्यासंगी आणि अधिकारी, खादी-ग्रामोद्योग बोर्डाचे अध्यक्ष श्री. वैकुंठलाल मेहता हे परिषदेचे अध्यक्ष होते. अशा प्रकारें या तीन अधिकारी निष्ठावंतांच्या प्रेरणेनें आणि मार्गदर्शनानें या परिषदेनें तीन दिवस ग्रामीण जीवनाच्या अनेक अंगांचें सविस्तर विवेचन केलें आणि तीन दिवसांच्या या मननानंतर त्यानुसार बोरीवली तालुक्यांतील २५।३० खेड्यांतून काम सुरूं करण्याची योजना आंखली आणि काम संपवलें.

परिषदेंत भाग घेतलेल्या प्रतिनिधींची संख्या शंभराचे आंतच होती. या प्रतिनिधींत खास विधायक कार्यकर्ते, विषयाचे व्यासंगी आणि या क्षेत्रांतील अधिकारी विद्वान् यांचाच अधिक भरणा होता. परिषदेचें खरें महत्त्व दोन गोष्टींत आहे. एक असें कीं, ' आधी केलें मग सांगितलें ' या तत्त्वानुसार ग्रामीण जीवन-विकासाच्या आदर्श संघटनेची कल्पना दृष्टीसमोर ठेवून काम करीत असलेल्या ' खेरवाडी सामाजिक कल्याण-संघ ' या संस्थेच्या स्वीकृत कार्यक्रमांतूनच या परिषदेची कल्पना पुढें आली व म्हणून तिच्या कामास एक आगळेंच महत्त्व प्राप्त झालें. या परिषदेचें खरें वैशिष्ट्य हें कीं तींत व्यासपीठ-प्रवचनें अत्यल्प व अत्यावश्यक तेवढींच ठेवण्यांत आलीं होतीं. परिषदेचा खरा भर गट-चर्चा ( Group thinking ) आणि गटपद्धति यांवर होता आणि या अगदीं लहानशा गटांतील सर्व सभासद प्रत्यक्ष कार्यकर्ते व अनुभवी असल्यानें मोंगळ वावदूकतेंत वेळ खर्चीं न पडतां वेगवान् विचार-मंथन आणि सार-संकलन होऊं शकलें. २-३ दिवसांच्या अल्पकालांत एका व्यापक विषयाच्या अनेक अंगोपांगांवर इतका खल करणें एरव्हीं अशक्य होतें.

आपल्या प्रारंभींच्या भाषणांत श्री. बाळासाहेब खेर यांनीं, आपण इंग्लंडमध्यें असतांना तेथील ग्रामीण-जीवनोद्धारक केंद्रांच्या कार्यक्रमाकडे कसे आकर्षित झालों व त्या केंद्रांच्या यशस्वी कार्यप्रणालींतूनच या परिषदेसारख्या उपक्रमांचा विचार आपल्या मनांत कसा आला हें सांगितलें. प्रगत व विशेषत्वानें औद्योगिक समजल्या जाणाऱ्या पश्चिमी देशांतहि ग्रामीण व शहरीं जीवनांत येथें दिसते तेवढी तफावत दिसत नाहीं. ग्रामीण जीवनाचें एक अंगच तेथें आढळतें. तें असें कीं, आपले प्रश्न सहविचारानें व गट-चर्चेनें आपले आपणच सोडवावे. आपल्या इकडे, शेतीप्रधान देश असूनहि आणि पांच लक्षांवर खेडीं अस्तित्वांत असूनहि, या स्वरूपाचें वातावरण अजून प्रत्यक्षांत उतरलेलें नाहीं. त्याला अनेक कारणें आहेत व त्यांचीं बीजें प्रस्थापित अर्थव्यवस्थेच्या प्रकृतींत खोलवर रुजलेलीं आहेत. पण म्हणूनच त्यांचा खोलवर विचार करून शहरी आणि ग्रामीण जीवनाचे व्यापार जींत परस्परपोषक ठरतील अशी एक व्यापक संघटना निर्माण झाली पाहिजे असें श्री. खेर यांनीं सांगितलें.

परिषदेच्या उद्घाटनानंतर प्रतिनिधींची त्यांच्या इच्छेनुसार व कार्यानुसार चार अलग गटांत विभागणी करण्यांत आली. ग्रामीण घर-बांधणी व स्वच्छता, शेती आणि बागायती, शिक्षण आणि समाज-कल्याण, ग्रामोद्योग व हस्तव्यवसाय अशा चार समित्या दुसऱ्या दिवसापासून आपल्या विषयावर विचार करूं लागल्या. प्रत्येक गटांत साधारणतः १५।२० सभासद, त्यांपैकीं प्रत्येकजण विशिष्ट तऱ्हेचा व्यासंग, कार्य, अनुभव यांनीं संपन्न. ( कांहीं प्रतिनिधी








परदेशांतील एतद्विषयक कामाचा अनुभव घेऊन आलेले होते. आणि उपस्थितांमध्यें मुद्दाम उल्लेख करावा अशी व्यक्ति म्हणजे हिमालयन प्रदेशांत काम करून त्याशीं एकरूपत्व पावलेले रेव्हरंड स्टोक्स् यांचे तंत्रज्ञ चिरंजीव ही होय.) आणि त्या चर्चेचें मार्गदर्शन अत्यंत अधिकारी व्यक्तीकडे. यामुळें साहजिकच चर्चेंत मुद्देसूदपणा व विशिष्ट पातळी राहिली. ग्रामीण घरें व स्वच्छता या समितीचें काम खुद्द श्री. वैकुंठलाल मेहता यांच्या आधिपत्याखालीं चाललें. कोरा ग्रामोद्योग-केंद्रावर खेड्यांत उपयोगी ठरणारे संडास, मोऱ्या इत्यादि अत्यंत जलद व अल्प खर्चांत कसे बांधावेत याचें प्रात्यक्षिक दाखविण्यांत आलें होतें. शेती – बागायती-विषयक चर्चा श्री. जब्बीरअली यांनीं पुरस्कारली. ग्रामोद्योग – समिति खादी – बोर्डाचे सभासद श्री. प्राणलाल कापडिया यांच्या देखरेखीखाली भरली आणि शिक्षणसमिति श्री. चंपकलाल मोदी, अध्यक्ष मुंबई-शहर-समाज-शिक्षण-समिति यांच्या अध्यक्षतेखाली काम करूं लागली. खुद्द श्री. बाळासाहेब खेर अर्थातच या गटांत भाग घेत होते व मार्गदर्शन करीत होते.

शनिवार ता. २९ ला सकाळपासून दुपारीं १२ पर्यंत व पुनः २॥ ते ५॥ पर्यंत या समित्यांची अलग चर्चा चालू राहिली. शिक्षणसमितीसमोर प्रथम श्री. मोदी व दुसरे समाजशिक्षणाधिकारी श्री. कर्णिक यांनीं आपले निबंध वाचले. ग्रामीण – समाज – शिक्षणाच्या प्रश्नाची फार उद्बोधक मांडणी या दोन्हीहि निबंधांत होती. त्यांचा मुख्य सूर कम्युनिटी-सेंटरांच्या द्वारें कांहीं मुख्य ग्रामीण समस्यांचा ऊहापोह करावा असा होता. श्री. मोदी यांनीं पुरस्कारलेली 'सांस्कृतिक-मंडला-' (Cultural Mission Programme) ची कल्पना व श्री. कर्णिकांना अभिप्रेत असलेली डेन्मार्कच्या धर्तीवरील लोकशाळा-(Folk schools) – योजना आणि कम्युनिटी-सेंटर्स या यांवर विचार झाला श्री. खेर यांनीं शहरी व ग्रामीण जीवन-प्रवाहांचा इंग्लंड-अमेरिकेसारख्या देशांतील गेल्या शंपन्नास वर्षांचा आढावा घेऊन खेड्यांतून शहरांकडे चाललेल्या या अप्रतिहत जनौघास कारण असलेल्या अनेक बाबींचें मार्मिक विवेचन केलें. वरील सांस्कृतिक-केंद्राच्या किंवा समाज-केंद्राच्या योजनेवर त्यांनीं भर दिला आणि असेंहि सांगितलें कीं याच स्वरूपाचें काम पण भिन्न नांवाखालीं 'परिश्रमालयें' म्हणून सध्यां चालू आहे. बांद्र्यानजीक खुद्द खेरवाडींत असें एक परिश्रमालय काम करीत आहे. शिक्षण – जीवनोपयोगी शिक्षण – देत असतांनाच खेड्यांचा सर्वांगीण विकास साधण्याच्या दृष्टीनें परिश्रमालयांची योजना फार मोलाची ठरली आहे. या चर्चेंत श्री. स्टोक्स यांनीं भाग घेतला. ते म्हणाले:- " हिंदी ग्रामीण जनतेशीं जो माझा संबंध आला त्यावरून माझा असा समज झाला आहे कीं ग्रामीण जनता अतिशय मवाळ, उदासीन आणि दुबळी अशी आहे. प्रथमतःच तिला आपल्या हक्क-कर्तव्याविषयीं जागरूक करण्याचा जोरकस प्रयत्न होणें जरूर आहे."

या मुद्द्यांवर अन्य एक-दोघांनींहि आपले विचार प्रगट केले. ग्रामीण जनता मवाळ आहे याचा अर्थ मात्र असा नाहीं कीं, बाहेरून खेड्यांत जाणाऱ्या ग्रामसेवकांना जनतेचें सहकार्य वगैरे सहजपणें मिळतें. उलटपक्षीं प्रत्यक्ष अनुभव असाच येतो कीं पहिले कित्येक महिने या अनभिज्ञ जनतेचे कान आणि मन आपणाकडे खेचण्यांतच संपून जातात. पुणे जिल्ह्यांतील एका तालुक्यांतील कांहीं खेड्यांत चालू असलेल्या लोक-शिक्षणाचा अनुभव जमेस धरतां असें आढळलें कीं लोकशिक्षण किंवा समाज-शिक्षण-योजनांचा पाया फार व्यापक आणि वस्तुस्थित्यधिष्ठित केला पाहिजे. केवळ अक्षर-ओळख किंवा लेखन-वाचन हातीं घेतलें तर प्रौढांना सातत्यानें फार काळ आकर्षिणें जमत नाहीं. लिहिणे – वाचणें ही केवळ पोरांचीं कामें आहेत असा त्यांचा समज असल्यानें तो त्यांना पोरखेळ वाटतो. बरें, यापेक्षां अधिक फलप्रद असें वृत्तपत्रवाचन व चर्चा यांच्या अनुरोधानें शिक्षण द्यावें तर तोहि कार्यक्रम अल्पकाळांतच शिळोप्याच्या गप्पा ( किंवा कुटाळक्या ) या सदरांत जमा होतो आणि विकासशील योजनेस मुळांतच खीळ बसते. असा एक भरीव, व्यापक पण संपूर्णतया ग्रामीण परिस्थितीवर आधारलेला कार्यक्रम हातीं घेणें जरूर आहे कीं ज्यांत बहुश्रुतता, साक्षरता, हस्तव्यवसाय व कष्टप्रियता या सद्गुणांचा मिलाफ होऊन कांहीं एका उच्च वातावरणांत विहार करीत असल्याची जाणीव







या जनतेस येईल. असा कार्यक्रम म्हणजे योजकत्व व संघटन यांची कसोटीच होईल. साधनसामग्री, कार्यकर्ते आणि सातत्य यांच्या साहाय्यानेंच तो राबवा- वा लागेल. – परिषदेंत अशा प्रकारची चर्चा होऊन 'जनता-कॉलेजेस्' अधिक प्रमाणांत हातीं घ्यावींत असा निष्कर्ष सर्वसंमत झाला.

परिषदेच्या तिसऱ्या दिवशीं सर्व समित्यांची एकत्र चर्चा होऊन खुलें अधिवेशन झालें आणि निरनिराळया समित्यांत संमत झालेल्या निष्कर्षावर पुनः कांहीं भाषणें होऊन ठराव संमत करण्यांत आले. या सर्वसंमत धोरणाप्रमाणें बोरीवली तालुक्यांतील कांहीं खेडयांतून सुमारें अडतीस हजार खेडुतांच्या सामूहिक विकासाचा प्रयत्न करण्यांत येईल.

### सर्वोदयाचें ग्रामीण कार्य

समाज – विकास – योजना, व्यक्तिगत राज्यांचें ग्रामविकासकार्य वगैरे आजचे सर्व प्रयत्न पहातां, वरील स्वरूपाची परिषद् म्हणजे कांहीं अगदीं नवीन योजना आहे असें कोणी समजत नाहीं. तिचें वैशिष्ट्य इतकेंच कीं अगदीं संबंधित अशा एका लहान गटांत चर्चारूपानें एका महत्त्वाच्या कार्यक्रमावर विचार झाला आणि शहरी व ग्रामीण जीवनक्षेत्रांतील वाढत्या विषमते-बद्दल नित्य जाणवणारी भीति कमी होत आहे याची खात्री पटली. कोरा ग्रामोद्योग केंद्र हें मुंबईजवळ असलें तरी अतिशय व्यवस्थित आंखलेलें असें तें एक निसर्गरम्य ठिकाण आहे. चामड्याचा उद्योग, अखाद्य तेलापासून साबण, तेलघाणी इत्यादि ग्रामोद्योग तेथें चालू आहत.

अगदी सहजपणें — कोणत्याहि तऱ्हेचा गाजावाजा, गडबड, पोलीस-बंदोबस्त वगैरेचा मागमूसहि नस- तांना — राज्याचे मुख्यमंत्री व इतर थोर कार्यकर्ते, माजी मंत्री वगैरे जमतात, दूर खेड्यांत टकळी- घाणीच्या परिसरांत जीवनोपासना करणारे खेडूत व तज्ज्ञ एकत्र होतात, औपचारिकता किंवा आतषबाजी यांची हकालपट्टी करून मुख्य मुद्द्यांशीं गांठ घालतात, चर्चा झाली, विचार झाला कीं तेथेंच अंगत-पंगत करून तेथेंच तयार केलेली भाजी-भाकरी खातात – या सर्व दृश्यानें ( जरी हीं दृश्यें आता सतत दिसतात तरी ) एक प्रकारचें अकृत्रिम समाधान वाटतें. अधिकाधिक ग्रामीण जनतेस सामावून घेऊन त्यांच्या दैनंदिन कार्यक्रमांतील अडी-अडचणींचा सामूहिक विचार करण्याच्या या प्रयत्नासारखे प्रयत्न इतरत्र होणें जरूर आहे.

---

## पुस्तक-परामर्श

**' गोमंतकांतील सामुदायिक मालकीची ग्रामसंस्था-पद्धति. '** ले. **वामन अनंतशेट खलप** प्रकाशक– **डॉ. ना. वा. खलप.**, विकास, गणेशवाडी, पुणें ४ (१९५५) पानें १००. किं. १॥ रु.

गोव्याचा इतिहास लिहितांना कांहीं लेखकांनीं तेथील ग्रामसंस्थांचा ओझरता उल्लेख त्यांच्या लेखां- तून वा ग्रंथांतून केला आहे. तथापि तेथील "ग्राम- संस्थेचा सर्वांगीण अभ्यास करून त्यावर मराठीमध्यें स्वतंत्र पुस्तक प्रकाशित करण्याचा हा पहिलाच प्रयत्न आहे. गोव्यांतील वैशिष्ट्यपूर्ण ग्रामसंस्थेचा मराठी वाचकांना प्रथमच परिचय करून दिल्याबद्दल लेखकाचें अभिनंदन केलें पाहिजे.

गोमंतकांतील ग्रामसंस्थेचीं ठसठशीत वैशिष्ट्यें दोन सांगतां येतील : एक तेथील गांवची सर्व जमीन तेथें सार्वजनिक मालकीची आहे. तेथील जमिनीचें उत्पन्न आणि खर्च तेथें सर्वांतच व सारखे विभागले जातात. ख्रिस्तपूर्व ५ व्या शतकांत तेथें सामुदायिक मालकी हक्काच्या तत्त्वावर या ग्रामसंस्थांची स्थापना झाली. आणि तेथें अनेक घडा- मोडी होऊन देखील गेलीं पंचवीसशें वर्षें तरी ही संस्था तेथें अद्यापहि स्थिर राहिली आहे. प्राचीन काळां- तील सर्व संस्कृति खाजगी मालकी हक्काच्या तत्त्वा- वर अधिष्ठित होत्या. अशा काळांत या ग्रामसंस्थांनीं हें अभिनव तत्त्व पुरस्कारिलें. तिचें हें वैशिष्ट्य आज देखील खास उल्लेखनीय आहे. तिचें दुसरें वेगळेंपण म्हणजे या ग्रामसंस्थांचा कारभार तिच्या सर्व नागरिकांच्या संमतीनुसार चालत असे. कोण- त्याहि ठरावाला एका नागरिकानें जरी नापसंती दर्शविली तरी तो ठराव अमलांत येऊं शकत नव्हता. सर्वच नागरिकांचें एकमत झाल्यानंतरच त्यांच्या निर्णयाला अखेरचें स्वरूप प्राप्त होई. भार- तांतील प्राचीन गणराज्यें आणि ग्रीसमधील नगर-








राज्यें यांमधून निवडणुकीचें तत्त्व होतें. प्रत्यक्ष लोकशाहीनुसार त्यांचे व्यवहार चालत. परंतु सर्वांच्या संमतीवर आधारलेली ही लोकशाही या ग्रामराज्यांतच परिणत होऊं शकली असें वाटतें. गांवांतील सर्व कामें – सार्वजनिक आरोग्य, शिक्षण, रस्ते-दुरुस्ती, पाणीपुरवठा इत्यादि— या ग्रामसंस्थेमार्फतच होत. गांवच्या जमिनी ग्रामसंस्थेच्या मालकीच्या. घरें, बागा, डोंगरांवरील झाडें यांच्यापासून त्यांना मुख्य उत्पन्न मिळें व वरील सर्व बाबींवर तो खर्च होई. खर्च करून रक्कम शिल्लक राहिल्यास ती सर्वांत सारखी विभागली जाई.

पोर्तुगीजांचा अम्मल सुरू झाल्यापासून मात्र तेथें आस्ते आस्ते सत्तेचें केंद्रीकरण वाढूं लागलें. आज या जुन्या ग्रामसंस्थाचीं पुष्कळ मूलतत्त्वें इतिहासजमा झालीं आहेत. आतां ग्रामसंस्थेचे सर्व सभासद व अध्यक्ष सरकार स्वतः निवडतें. त्यांचीं सर्व कामें त्याच्या नोकरवर्गामार्फत केली जातात. त्यामुळें आतां या ग्रामसंस्थांना त्यांच्या मालकीच्या जमीनीचे उत्पन्न गोळा करणें व तें इतरांत सारखें विभागणें एवढेंच कार्य उरलें आहे. तरी देखील कांहीं ग्रामसंस्था एकत्र येऊन स्वयंस्फूर्तीनें व सहकार्यानें कांहीं सार्वजनिक कामें करीत असतात. उदा०, बार्देश तालुक्यांतील म्हापसें शहरांत या संस्थांनीं एक दवाखाना काढला असून तेथें दुबळे, अनाथ व अपंग यांची उत्तम व्यवस्था केली जाते. सरकारनें अशा कामाची उपेक्षा केल्यामुळें तेथील ग्रामसंस्थांनीं आपल्या उत्पन्नांतून अशीं कामें हातीं घेतलीं आहेत.

गोव्यांतील ग्रामसंस्थेचीं दोन्हीं तत्त्वें–सामुदायिक मालकी आणि सर्वांची पूर्ण संमति–कितीहि उदात्त असलीं तरी तीं प्रत्यक्ष अंमलबजावणींत निर्दोष म्हणतां येत नाहींत. कारण अगदीं प्रारंभीं ज्या लोकांनीं या भागांत येऊन वसाहती केल्या त्यांच्या घराण्यांतील पुरुषासच फक्त हा अधिकार भोगतां येतो, आणि असे नागरिक त्या ग्रामसंस्थेमध्यें शें. १९–२० टक्के सुद्धां नसावेत. त्यामुळें प्रत्यक्षांत ही उदात्त तत्त्वें तेथील अत्यल्प समाजापुरतींच मर्यादित झालेलीं आहेत.

आजच्या लोकशाहीच्या काळांत अशा विशिष्ट घराण्यांची सर्व जमीनीवरील मालकी निश्चित अनिष्ट आहे. मध्ययुगांतील सरंजामशाहीसारखेंच याचें स्वरूप आहे. श्री. खलप यांनीं या पद्धतीच्या इष्टानिष्टतेबद्दल फारशी चर्चा केली नाहीं. उलट ती टिकलीच पाहिजे अशा विचाराकडेच त्यांचा कल झुकलेला आहे.

त्याचप्रमाणें या ग्रामसंस्था द्राविड संस्कृतींत वाढलेल्या वैश्यलोकांनीं स्थापलेल्या आहेत असा त्यांनीं सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न केला आहे. खरोखर द्राविड संस्कृतीतूनच या संस्था उदयाला आल्या काय ? आणि त्यांतहि फक्त वैश्य समाजानें त्या तेथें निर्माण केल्या काय ? – हे दोन्ही प्रश्न वादग्रस्त असण्याचा संभव आहे. संशोधकांनी त्यावर अधिक प्रकाश टाकावा.

पुस्तकामधील विवरणामध्यें मात्र सुसंगति अधिक असायला हवी होती. प्रकरणांचें वर्गीकरण जास्त शास्त्रशुद्ध पद्धतीनें करायला पाहिजे होतें. ग्रामसंस्थांचा ऐतिहासिक विकास, त्यांचीं कर्तव्यें, अंदाजपत्रकें, सरकारी नियंत्रण, कारभार अशा स्वरूपांत ही चर्चा व्हावयास हवी होती. कांहीं ठिकाणीं वाक्यरचना आणि शब्दयोजना देखील मराठीच्या प्रकृतीशीं विसंवादी वाटते. वरीलसारख्या कांहीं उणीवा व दोष सोडल्यास हें पुस्तक स्थानिक संस्थेच्या अभ्यासकांना उपयुक्त ठरल्यावांचून राहणार नाहीं. वयाची सत्तरी ओलांडल्यावर आणि वार्धक्यानें शरीर जर्जर झाल्यानंतर देखील ज्ञानावरील निष्ठा कायम ठेवून श्री. खलप यांनीं परिश्रमपूर्वक मराठींत या विषयावर हा पहिलाच ग्रंथ लिहिल्याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें पाहिजे.

– मा. प. मंगुडकर















अनुक्रमणिका